# इंदु काळे व सरला भोळे

## [ १ ] " आपली होऊं पहाणारी "

श्री काळे यांचा वाडा,
नारायणपेठ, पुणें.
ता. ९।३।१९१९.

श्रीयुत विनायकराव भोळे यांस सा. न. वि. वि.

" कुमारी सरला काळे हीस शक्य तर न फोडतां देणें " असा शेरा असलेलें व माझ्या वडिलांच्या पत्रांत घातलेलें माझ्या नांवाचें पत्र वडिलांनीं न फोडतांच माझ्या स्वाधीन केलें. वडिलांनीं माझ्यावर दाखविलेला विश्वास पाहून आनंद वाटला व त्यांच्या विश्वासास नेहमीं असेंच पात्र रहावें असा विचार मनांत आला.

येथपर्यंतचा मजकूर कसा तरी लिहिला. पण याच्या पुढें काय लिहूं आणि कसें लिहूं असें झालें आहे. मी आडनांवानें " **काळे** " आहें तशीच रंगानेंहि आहें, हें आपण प्रेमान्ध झाले असलांत तरी देखील आपण कबूल कराल. त्याचप्रमाणें हेंहि खरें मानावें कीं मी नांवाप्रमाणें मनानेंहि 'सरळ' आहें. आणि म्हणून मी " जरी तरी " " जर–तर " वगैरेचीं आडवळणें न घेतां एकदम " होय " असें म्हणून टाकतें. मला

ठाऊक आहे, कीं असें एकदम म्हटलेल्या "होय" ची किंमत कमी लेखण्यांत येते. हिरव्या पानांच्या आड अर्धवट लपलेली गुलाबाची कळी जशी लोकांना आवडते, त्याप्रमाणेंच संदिग्ध शब्दांच्या आड लप-लेला "हो" कार लोकांना आवडतो हेंहि मी जाणतें; पण काव्यात्मक लिहिणें हा माझा हेतु नाहीं आणि माझ्याबद्दल एखादी कादंबरी किंवा लघुकथाहि लिहितां यावी अशी माझी इच्छा नाहीं. म्हणून विवाहाला माझीच संमति आहे इतकेंच नव्हे तर आईची व वडिलांचीहि संमति आहे, गोत्राची आडकाठी नाहीं, आणि पत्रिका वगैरे वडिलांना पाहायच्याच नसल्यामुळें ग्रह, गण, नाड्या, मंगळ वगैरे कांहीं आड येत नाहींत हेंहि लगेच सांगून टाकल्यें. यामुळें अर्थात् आपल्या विवाहांतला रम्यकथात्मक भाग नाहींसा होईल. पण आपण तरी आपल्या प्रेमाची रम्यकथा होण्यापेक्षां आपलें वैवाहिक जीवन रम्य व्हावें, अशी इच्छा मनांत बाळगणें साहजिक आहे.

सामान्यतः पहिल्याच भेटींत किंवा पत्रांत न सांगण्यांत येणारें खरें हृद्गत एकदां ओकून टाकल्यावर आतां आपणाला आणखी एक दोन मनांतल्या खऱ्या गोष्टी सांगत्यें. (अजून अक्षता पडल्या नाहींत तरी त्या सांगण्याचा मला अधिकार प्राप्त झाला आहे असें वाटतें!) आपण खरोखरच आडनांवाप्रमाणें 'भोळे' आहांत. व्यवहारज्ञान मुळींच नाहीं. आपली मनधरणी मी करावी इतकी मी मनानें आपली अंकित झालें आहें ही गोष्ट, इतक्या दिवसांची ओळख असून, आपल्या ध्यानांत आली नाहीं आणि आपणच माझी मनधरणी करूं पाहतां यावरून आपल्या भोळेपणाची आणि व्यवहारशून्यतेची कमालच झाली म्हटलें पाहिजे. दुसरा एखादा असता तर,—पण दुसरा कोणी असता तर मी "होय" म्हटलेंहि नसतें!

आपण मधून मधून मला भेटण्याची आणि बरोबर फिरावयास जाण्याची इच्छा दर्शवितां, पण (मला जुन्या चालीची म्हटलं तरी चालेल) मला आतां हें कसेंसेंच वाटतें. वाङ्‌निश्चय झाल्यावर (किंवा आधींहि)

बरोबर फिरावयास जाण्यामध्यें कांहीं वाईट आहे असें मला वाटत नाहीं. पण मी आपली लाजाळू म्हणा, कांहीं म्हणा, आहें ही अशी आहें. आपल्याकडे पाहून लोकांनीं कुजबुजावें, साभिप्राय नजरेनें पहावें, वगैरे गोष्टी मला सहन होणार नाहींत. तरी असें कांहीं करूं नये. मुहूर्त लवकरच आहेत; मग हवें तेवढें फिरावयाला जातां येईल. आपलें लग्न ठरलें आहे ही गोष्ट कोणास सांगूं नये, व "काळे-भोळे" या शब्दावर अनुप्रासादि अलंकार साधण्याची कॉलेजमधील उदयोन्मुख कवींना संधि देऊं नये. माझ्या आईकडून हें गुपित ठेवलें जाणार नाहीं अशी भीति वाटते. ती खरी ठरल्यास कॉलेजमध्यें काव्यलतांना पुष्पांचा बहर येईल, विनोद-लहरींना भरती येईल, आणि कुजबुजणीं ऐकून भिंतींचेहि कान किटतील! शिवाय एम्. ए. झाल्यावर नौकरी न मिळाल्यास माझ्या काळ्या निळ्या रंगाच्या अखंड भांडवलावर रंगाचा एखादा कारखाना काढावा असा आपणांस सल्ला देण्यांत येईल; आणि (गडकऱ्यांपासून उसनी घेतलेली) ही कारखान्याची अजब कल्पना पसंत न पडल्यास आणि लेखनव्यवसायच करावयाचा तुमचा हेतु असल्यास तुम्हांस शाईचा खर्च मुळींच पडणार नाहीं अशीहि ग्वाही आपणांस देण्यांत येईल! कांहीं मुलें आपला वाङ्‌निश्चय "तोंडा तोंडी"च झाला आहे का लेखी कांहीं आहे असा प्रश्न विचारून तोंडसुख घेतील, तर त्यांतला एखादा मुलगा लगेच "अरे, यांचा वाङ्‌निश्चय म्हणजे नेहमींच "इन् ब्लॅक ॲन्ड व्हाइट्" असायचा असें म्हणेल! आमच्या रंगावरची ही कोटि जणूं समजली नाहीं असें सोंग करून तिसरा म्हणेल कीं याचा अर्थ काय बुवा? चवथा म्हणेल "काळ्या चिऱ्यावरची पांढरी रेघ" असा अर्थ. पांचवा म्हणेल "पांढऱ्या दगडावरची काळी रेघ" म्हटलें तर तें अधिक शोभेल! आमच्या मुलीमुलींत इतक्या मोकळेपणानें पण निष्कपट रीतीनें चेष्टा होणार नाहीं. त्यांच्या चेष्टेंत बाह्यतः सभ्यता असेल पण तींत असूयादि विकारांचें विषहि असेल. असली ही चेष्टा-कुचेष्टा आपण खिळाडू वृत्तीनें सहन करूं शकाल, किंबहुना आपणहि त्यांत भर घालून

" हसहसाट " अधिक पिकवाल. पण आपली खिळाडू वृत्ति मला कितीहि प्रिय असली तरी ती मला कांहीं साधणार नाहीं आणि आपली ही अशी चेष्टा माझ्या देखत झाली तर गडकऱ्यांच्या इंदूबिंदूप्रमाणें " मी लाजेन " आणि अमावास्येच्या अंधाऱ्या आभाळांत काळेकुट्ट मेघ जसे यावेत किंवा काळा रंग दिलेल्या टेबलावर शाई जशी सांडावी तशी माझी अवस्था होईल !

पलीकडच्या वर्षी आपण आमच्या घरीं भाऊच्या निमित्तानें येऊं लागलांत तेव्हां आपली खादीभक्ति वगैरे पाहून आपण कोणी चमत्कारिक देशभक्त आहांत असें मला वाटत होतें. आपण गेल्या वर्षी " फेलो " म्हणून शिकवायला येत होतां तेव्हां पहिले कांहीं दिवस मी आपल्या उग्र देशाभिमानाला फार भीत होत्यें, पुढें भीतीमध्यें आदराची भर पडली, आणि दुसऱ्या सहामाहींत प्रेमानें हृदयांत ठाणें दिलें. पण बोलण्याची चोरी. पुरुषांप्रमाणें बायकांना पुढें कोठल्या तरी युगांत मन मोकळें करून बोलतां–चालतां येईल काय ? पुढचें कोणास ठाऊक !

आपल्या पत्रांतील दुसऱ्या कांहीं गोष्टींबद्दल लिहावयाचें आहे. पण पुढें केव्हां तरी लिहीन. आपल्या प्रमाणें मला काव्यात्मक भाषा लिहितां येत नाहीं. माझ्या पत्रांत नंदनवन, उद्यान वगैरे कांहीं नाहीं. (गुलाबाचें फूल एकदां आलें आहे, पण त्यांत गुलाबी कोडें नाहीं, कांहीं नाहीं !) कमलिनी ज्या सूर्याची मार्गप्रतीक्षा करीत असते तोच सूर्य कर पसरून प्रेमयाचना करूं लागला तर तिचें मुखकमल कसें होईल याचें चित्र मनश्चक्षूं पुढें आणावें म्हणजे माझा सगळा भावार्थ ध्यानांत येईल. " होय " म्हणून निर्लज्जासारखें सांगितल्यानंतर आतां ध्वनिकाव्यात्मक हें लाजणें–मुरडणें कशाला, असें विचारल्यास मलाहि मनांत आणल्यास काव्यात्मक लिहिण्याचा प्रयत्न करतां येतो (व तो फसतो !) हें आपल्या नजरेस आणून द्यावयाचें होतें, हें त्याचें उत्तर आहे.

आपले मित्र नारायणराव पाठक आज सहजगत्या मंडईत भेटले होते. त्यांनीं मंदस्मित केलें. त्यांत कांहीं तरी अभिप्राय असावा असें दिसलें.

"मला तुमची प्रेमकथा सगळी ठाऊक आहे; पण सध्यां कशाला बोलूं? योग्य वेळीं अभिनंदन व चेष्टा करीनच" अशा प्रकारचा अभिप्राय त्यांच्या मंदस्मितांत गर्भित होता. त्यांना आपलें मनोगत कळलेलें दिसतें. पुरुषांना देखील गुपित ठेवतां येत नाहीं हीच गोष्ट खरी! कळावें, लोभ दिवसेंदिवस वृद्धिंगत व्हावा, हे विनंति,

आपली—

( येथें आतां काय लिहूं? कांहीं तरी लिहितें झालं. आपली स्नेहलोलुप—नको हा बडा शब्द नको—"**आपली**" होऊं पहाणारी,

**सरला काळे**

---

## [२] अचरटपणा, का लाडिकपणा, का सरळपणा

काळे यांचा वाडा,
नारायण—पेठ, पुणें.
ता. १३—३—१९१९.

रा. रा. विनायकराव भोळे यांस—

सा. न. वि. वि. भेट घेऊं नये म्हणून मी विनंती केली ती मान्य करून पत्रद्वारेंच भेट घेतली हें बरें झालें, पण आपल्या पत्रांत "मी एम्. ए. झाल्यावर देशाच्या कार्याला वाहून घेणार आहें, पुढें आपत्ति येतील याची पूर्ण जाणीव मनांत बाळगून 'होय' म्हटलें आहेस ना?" वगैरे कशाला लिहिलें? माझ्याबद्दल एवढी खात्री नव्हती, तर मग पहिलें पत्र तरी कशाला लिहिलें?

हें वाक्य रागानें लिहिलें आहे असें वाटेल आणि रागानें लिहिलें हें खरेंहि आहे. पण राग क्षणिक होता. मला आपला उदार हेतु समजतो. तरी पण रागाचा आविर्भाव आपणाशीं आणूं नाहीं तर मग कोणाशीं

आणावा? पुनः एकदां रागाचा आविर्भाव आणून मनाला क्षणभर बोंचेल असें लिहित्यें.

"कोळशाच्या खाणींतलें माणिक" असें कॉलेजांतले सगळे मुलगे मला म्हणतात. अशा "मेघश्याम" मुलीला डोळे उघडे ठेवून आपण वरिलें तें माझ्या वडिलांकडून चांगला हुंडा मिळेल या आशेनें असें लोक म्हणतात. तें खरें आहे का? तें जसें अर्थात् खरें नाहीं, तसेंच मी आपणाला मोठी नोकरी लागेल व बड्या अधिकाऱ्याची मी बडी अधिकारीण होईन या आशेनें वरिलें ही आपली शंका खोटी आहे.

मी आपणांला मनानें वरिलें तें आपल्या थोर विचारांना, उज्वल देशभक्तीला, पवित्र आचरणाला व उच्च प्रकारच्या खिलाडू वृत्तीला भाळून आणि त्यांवर भ्रमरीप्रमाणें लुब्ध होऊन. अर्थात् आपल्या उच्च आकांक्षांच्या आणि देशभक्तीच्या आड मी कशी येईन? ज्या गुणांनीं देवाला देवत्व आलें, ते गुण त्या देवाला मी सोडण्यास सांगेन आणि दगडाच्या मूर्तीचीच पूजा करीन असें वाटलें तरी कसें? बाकी पुरुषांना केव्हां काय वाटेल हें कोणी सांगावें? राम एवढा चांगला पण त्यानें सितेला टाकिली; ऑथेल्लो एवढा थोर मनाचा, पण डेस्डेमोनाबद्दल त्यानें शंका-कुशंका घेतल्या. व आपणहि थोरच आहांत, आणि आपली पत्नी होऊं पाहणारी माझ्यासारखी काळी-बेंद्री, तेव्हां लग्नाच्या आधींपासूनच शंका-कुशंका येऊं लागल्या आहेत हेंहि ठीकच आहे!

बाकी थट्टेचा हा राग सोडून देऊन मघांचाच प्रश्न पुनः विचारावासा वाटतो. पण तो विचारूं का नको असं झालं आहे. माझ्या वडिलांच्या श्रीमंतीशिवाय व माझ्या 'काळे'पणाशिवाय माझ्यामध्यें कोणता गुण दिसला, कीं त्यामुळें गद्यकाव्यात्मक पत्र लिहिण्याची स्फूर्ति मिळावी? "माझें सुशिलत्व" हें जर उत्तर असेल तर सुशिल मुलगी पतीच्या सत्कार्यांच्या आड येत नाहीं हें मी सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. सुशीलत्व नसेल तर मग माझ्यामध्यें काय दिसून मी पसंत पडलें हा मला प्रश्न

पडला आहे! प्रश्न नाजुक आहे, तेव्हां उत्तर देऊं नये किंवा द्यावयाचें असल्यास मागील पत्रांतल्याप्रमाणें फुलें, गुच्छ, उद्यान, नंदनवन, मलयवायु वगैरेंचा अनेकरंगी व सुवासिक शब्दांचा (लग्नमुंजीच्या निमंत्रणपत्रिके-वरील केशराच्या शिडकावाप्रमाणें) शिडकाव करावा म्हणजे मी फसून जाईन.

असले प्रश्न मी वास्तविक विचारूं नयेत, पण मन मोकळें करून बसतां–बोलतां येत नाहीं, थट्टामस्करी करतां येत नाहीं, रुसतां–रागावतां येत नाहीं, म्हणून पत्रद्वारेंच कांहीं तरी लिहीत–बडबडत आहें, झालं.

'आपली' होऊं पाहणारी,

**सरला काळे**

ता. क.

यापुढें केवळ पत्रद्वारेंच भेटण्याची जरूर नाहीं. आईनें लग्न जुळल्याचें एका बाईजवळ चुकून (?) सांगितलें! आतां नारायणराव पाठक इत्यादि आपल्या मित्रांचे आणि इतर लोकांचे अर्थगर्भ दृष्टिक्षेप सहन केलेच पाहिजेत. आणि कोणी कुतूहलानें, कोणी सहानुभूतीनें आणि कोणी उपहा-सानें लग्नाविषयीं प्रश्न विचारले तर त्यांचीं उत्तरें कशीं तरी देऊन टाकलींच पाहिजेत. आपलें ठीक आहे, पण मला हें "भयंकर दिव्य" वाटतें.

**स. का.**

## [ ३ ] मोह-पाश

काळे यांचा वाडा,
नारायण पेठ, पुणें,
२४–९–२०.

मित्रवर्य नारायणराव पाठक यांस विनायक भोळे याचे सा. न. वि. वि.

आपण दिवाळीच्या सुटींत अहमदाबादेस येऊन गांधींचा सत्याग्रहाश्रम पाहून व कांहीं दिवस राहून जावें म्हणतां. पण गांधींबद्दल मला कितीहि

आदर असला आणि सत्याग्रहाश्रमाची अंतःस्थिति व अंतर्व्यवस्था स्वतः डोळ्यांनीं पाहण्याची कितीहि इच्छा असली तरी सध्यां मी येऊं शकत नाहीं; कारण मला सध्यां टेनिस आणि माझी सरला यांपेक्षां कांहींहि अधिक नको आहे, अशी माझ्या मनाची स्थिति झाली आहे. माझ्या सारखा मनुष्य पत्नीच्या पाशांत इतका गुरफटला जाईल अशी तुम्हांला स्वप्नांत देखील कल्पना आली नसेल. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं उमर खय्यामप्रमाणें मीं एखाद्या नदीकांठची फुलबाग, फळबाग आणि माझी "सरला" एवढ्या सामग्रीवर सबंध आयुष्य कंठण्यास तयार आहें! उमरला कवितांचें एखादें पुस्तक आणि मद्य यांची जरूर वाटत होती, मला त्यांचीहि अपेक्षा नाहीं. पुस्तक घ्यावयाचें झाल्यास काव्याचें न घेतां भगवद्गीता घेईन किंवा एच्. जी. वेल्स याचा जगाचा इतिहास घेईन. आणि दारूच्या ऐवजीं चहा घेईन. तुझ्या सारख्या मित्रांना टेनिस खेळण्याकरितां व चहा पितांना गप्पा गोष्टी मारण्याकरितां मधून मधून आमच्या एकछत्री उद्यानराज्यांत येण्याबद्दल परवाने मिळतील, पण फार दिवस रहावयाचें झाल्यास सपत्नीक आलें पाहिजे अशी अट घालण्यांत येईल!

खरोखर माझ्यासारखा मनुष्य एखाद्या युवतीच्या नादीं लागून इतका पागल कसा बनतो हें आश्चर्य आहे. पण हल्लीं सरलेशीं बोलणें हाच माझा वाङ्मय-विहार, तिच्याशीं चर्चा करणें हीच माझी तत्त्व-मीमांसा, तिचे शब्द ऐकणें हेंच माझें गायनश्रवण, आणि तिला खूष करण्याकरितां पाहिजे तें करणें हाच माझा स्वार्थत्याग! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तिच्या संगतींत सदैव राहणें हाच माझा स्वधर्म झाला असून या स्वधर्माकरितां दैहिक, मानसिक आणि आत्मिक मरण पत्करण्यास मी तयार आहें. म्हटलेंच आहे, "**स्वधर्मे मरणं श्रेयः परधर्मो भयावहः**" आई-बाप, बहीण-भाऊ, मला कांहीं नाहींत, हें एकापरी बरेंच झालें, कारण घरजांवई म्हणून सरलेकडे राहणें त्यामुळें साहजिक झालें आहे. घरजांवई म्हणून चैनींत रहावयाचें, कॉलेजांत लेक्चररशिप

करावयाची, संध्याकाळीं टेनिस खेळावयाचें, रात्रीं थोडेंबहुत वाचन करावयाचें, हा माझा सध्यांचा उद्योग आहे. लेक्चररशिप वर्षापुरतीच आहे. ती एप्रीलमध्यें संपल्यावर कदाचित् विलायतेस जावें म्हणतों. (श्वशुरांनीं हुंडा दिला नाहीं. तेव्हां ते अवश्य तेवढे पैसे देणार आहेत असें सरलेकडून कळतें. प्रत्यक्ष बोलणें कांहींच झालेलें नाहीं.) सरलेलाहि ऑक्सफर्डची बी. ए. डिग्री मिळविण्याची उमेद दिसते; पाहूं या काय होतें तें.

येथें असतांना एक दिवस मला उठण्यास उशीर झाला तेव्हां तुम्ही, सरलेच्या संगतींत रात्र सरल्यासारखी वाटतच नसेल, असें म्हणून तिच्या काळेपणाची कुचेष्टा केली व तिनें माझ्याकडे साभिप्राय पाहून "असं कसं होईल, सूर्याच्या पुढें अमावास्या झाली तरी तिचं काय चालणार?" असं कांहीं तरी म्हणून बाह्यतः खिळाडूपणानें उत्तर दिलें हें तुम्हांला आठवत असेल. आपण त्या वेळेस सगळेजण हंसलों, पण तिला आपल्या काळेपणाची चेष्टा केलेली आवडत नाहीं, हें तुम्हांस एक गुह्य सांगून ठेवतों. पुरुषांना जशी आपल्या शीलाची किंवा पौरुषाची फार चेष्टा केलेली आवडायची नाहीं, त्याचप्रमाणें बायकांना आपल्या कुरूपतेची चेष्टा आवडत नाहीं हें तत्त्व मला अलीकडे कळूं लागलें आहे. विशेषतः तुम्हीं हें ध्यानांत धरा, कारण तुम्हांला विनोद करून हंशा पिकविण्याचा फार मोह होत असतो आणि आपण कोणाशीं काय बोलतों इकडे तुमचें लक्ष नसतें.

आपला मित्र

**विनायक लक्ष्मण भोळे**

ता. क.—

मनुष्य एका हत्तीला माणसाळवून त्याचा उपयोग इतर हत्तींना पकडण्याचे कामीं करतो, त्याप्रमाणेंच निसर्गानें मला संसारपाशांत अडकवून तुम्हांसारख्यांना अडकविण्याचे कामीं माझा उपयोग करण्याचें योजिलें आहे. थोडक्यांत आणि स्पष्टपणें सांगावयाचें म्हणजे तुम्ही मनांत आणलेल्या मुलीशीं लवकर लग्न करून घ्यावें म्हणजे माझ्यासारखे सुखी व्हाल.

तुमची प्रकृति कां बिघडलेली असते हें मला ठाऊक आहे, तेव्हां खोटा आविर्भाव आणूं नये.

**वि. ल. भोळे**

## [ ४ ] मनोरथ

सत्याग्रहाश्रम, साबरमती,
१–६–२१.

प्रियपत्नी सरला हीस आशीर्वाद, विशेष.

तुझ्या वडिलांनीं ६ हजार रुपये मी देतों, गव्हर्नमेंट ऑफ इंडियाची स्कॉलर्शिप व टाटा स्कॉलर्शिप मिळविण्याचा प्रयत्न करा, असें आग्रह करून सांगितलें म्हणून मी अर्ज केला आहे. पण विलायतेला जाण्याची इच्छा नाहीं. एक तर तुझा तेथें विसर पडेल आणि कांहीं तरी होऊन जाईल! दुसरें आणि खरें कारण असें कीं माझी देशाभिमानाची वृत्ति गांधीच्या सत्याग्रहाश्रमांत आल्यापासून पुनः जोरावली आहे. मला वाटूं लागलें आहे, कीं शहरांत श्रीमन्तीच्या ऐटींत राहून नोकरांचाकरांवर अधिकार गाजविण्यापेक्षां खेड्यांत गरिबीनें राहून लोकांची सेवा केलेली अधिक चांगली.

विलायतेंत मी तुलाहि बरोबर घेऊन जावें, तूं तेथें ऑक्सफर्डमध्यें अभ्यास करावास, पैशाची काळजी नको, असें तुझ्या "भाऊं"चें पत्र आलें आहे. तुला ऑक्सफर्डचें शिक्षण मिळावें हा तुझ्या वडिलांचा खरा हेतु आहे, का माझ्यासारख्या भटक्या तट्टाला पायबंद म्हणून तुला पाठविण्यांत येत आहे, का दोनहि हेतु खरे आहेत हें त्यांचें त्यांना (व तुलाहि!) ठाऊक. पण स्कॉलर्शिप्स मिळाल्या तरी मी विलायतेस जाईन किंवा नाहीं याची वानवाच आहे. तेव्हां शिक्षणाचे वगैरे मनांतले मांडे मनांतच खावे लागणार. आणि विलायतेस जातांना कोणतें सामान घ्यावयाचें, कोणत्यां साड्या, लुगडीं, पातळें वगैरे घ्यावयाचीं, हे सगळे तुझे

आणि तुझ्या श्रीमन्त आईचे महत्वाचे प्रश्न दरिद्यांच्या मनोरथांप्रमाणेंच उत्पन्न होऊन विलय पावणार !

तुझा भाऊ आणि कुमारी इन्दु गुप्ते यांचेबद्दल लोकापवादाचें थोडेंसें वादळ उत्पन्न झाल्याचें नारायणराव पाठकांचे पत्रावरून कळतें. भाऊला म्हणावें, लोकापवादाला भिऊं नये. लोक पाहिजे तें बोलतील. इन्दु गुप्तेकडे त्याचें मन ओढ घेत होतें हें मला ठाऊक आहे. तोच माझ्याशीं तिच्या-बद्दल गोष्टी बोलत असे. ( आणि मीहि त्याच्याशीं त्यावेळीं " सरल " म्हणून ओळखली जाणारी एक मुलगी होती तिच्याबद्दल त्याच्या बरोबर बोलत होतों ! ती मुलगी पूर्वी 'कृष्णकारस्थानी' होती आतां " भोळी " झाली आहे !) इंदु गुप्ते सुशील आहे, पण सुंदर नाहीं असें मी त्याला म्हणत असें. ऐकतों तें खरें असेल तर ती सुशीला नाहीं असेंहि मला म्हणावें लागेल. कोणाचा कांहीं तरी गैरसमज होऊन हें वादळ उत्पन्न झालें असावें असें माझें अंतःस्थ मन सांगतें व शेवटीं सर्व शुभमंगल होईल अशी माझी कल्पना मला सुचवते. खरें काय तें लवकर कळवावें.

**विनायक भोळे**

ता. क.–तुझ्या पत्रांत मराठी शुद्धलेखनाकडे तुझें पूर्ण दुर्लक्ष आहे असें दिसतें. इंग्रजी स्पेलिंगमध्यें एखाद्यानें चूक केली म्हणजे तुम्ही मुली देखील त्याला हंसतां. पण मराठी लेखनांत शुद्धाशुद्धतेचा तुम्ही विटाळ मानीत नाहीं असें दिसतें. असल्या क्षुल्लक गोष्टींकडे मी दुर्लक्ष करणेंच कदाचित् श्रेयस्कर होईल. पण अचरटपणाचें आचरण पाहून मनाला बोंचल्या-सारखें होतें तसें अशुद्ध लेखनहि ( अल्पप्रमाणांत कां होईना ) मला बोंचतें. एखाद्या 'सुशील' युवतीला 'सुशिला' बनवून दगडाच्या पंक्तीला, तिला बसविणें मला कसें आवडेल ? रामाच्या सीतेला कधीं कधीं तूं 'सिता'च बनवितेस, 'शिता'ची योग्यता तिला आणीत नाहींस हें तिचें व माझें नशीबच म्हणावयाचें. कुंकू लावण्यासंबंधीं अलीकडच्या बायका जसा निर्बंध पाळीत नाहींत, त्याप्रमाणेंच अनुस्वाराचीं टिंबें देण्यासंबंधींहि तुझा अनिर्बंध व्यव-

हार आहे, हेंहि बरोबर नाहीं, 'इंदु'-कलांचा 'आकार' जसजसा वृद्धिंगत होत जाईल तसतशी शोभाहि वाढत जात असली तरी 'इंदू' गुप्ते मधील 'उ'कार वाढून तिची शोभा वृद्धिंगत होईल असें मुळींच नाहीं; उलट तुझी मात्र शोभा होईल. ध्यानांत ठेव कीं जोंपर्यंत तूं अशुद्ध लिहीत आहेस तोंपर्यंत तुझी पति-'**पुजा**' कितीहि मनापासूनची असली तरी ती मला अशुद्धच वाटणार. तेव्हां असें करूं नये अशी 'विनंति' (ऱ्हस्व, दीर्घ नव्हे.) कॉलेजमधल्या मुलीला असें लिहिणें योग्य नसेल, एकदां दोनदा लिहून पाहीन, पुढें सोडून देईन. देशभक्तीच्या वाऱ्यामुळें माझ्या स्वभावांत हटवादीपणा आला असल्यास क्षमा करावी. तो लवकरच जाईल.

**विनायक भोळे**

---

## [५] जोडे खाल्ले, पण जन्माचा जोडीदार झालों

काळे यांचा वाडा,
नारायणपेठ, पुणें.
ता. ७-६-२१.

मित्रवर्य विनायकराव भोळे यांस सूर्यकांत ऊर्फ भाऊ काळे याचा नमस्कार वि. वि. सरलेला लिहिलेलें पत्र तिनें मला वाचण्यास दिलें. त्यांतील शेवटल्या भागासंबंधीं असें सांगावयाचें, कीं शुद्धलेखनाच्या दृष्टीनें माझ्या पत्रांकडे मुळींच पाहूं नये,—कारण मी शुद्धलेखनाच्या पलीकडे गेलेला आहें! आतां आमच्यांत सुधारणा होणें नाहीं. सरलेची सुधारणा होऊं शकेल, पण तिच्या चुका दाखवून तिचें अज्ञान तिच्या पदरांत घालणें हें चांगलें धोरण नव्हे. अशानें मनुष्याचा स्वाभिमान नष्ट होतो.......सरलेला पत्र थोडेंसें लागलेलें आहे हें गुपित सांगतों, तें ध्यानांत धरावें. क्षुल्लक गोष्टींना भलतेंच महत्व द्यावयाचें आणि भाषाभिमान देशाभिमान वगैरेबद्दलच्या गोष्टी वेळ-अवेळ, काळ-स्थळ न पाहतां हटवादीपणानें बोलावयाच्या हा जो दोष कांहीं देशाभिमानी लोकांमध्यें दिसून येतो तो तुमच्यामध्यें डोकावूं लागलेला दिसतो. सावध रहावें.

# इंदु काळे व सरला भोळे

कुमारी इंदु गुप्ते व मी यांच्याबद्दलच्या खऱ्या-खोट्या बातम्या साबरमती–अहमदाबादेपर्यंत गेल्या म्हणावयाच्या ? सुरवंटांना एकदांच पंख फुटून ते पतंगरूपानें उडतात, पण बातम्यांना क्षणोक्षणीं पंख फुटतात आणि प्रत्येक खेपेला ते निरनिराळ्या रंगाचे असतात, असें तुम्ही काव्यात्मक भाषेंत म्हणत असतां तेंच खरें म्हटलें पाहिजे. बातम्या खऱ्याखोट्या म्हटलें तें मुद्दाम म्हटलें. कारण त्यांत कांहीं खऱ्याहि आहेत. तिच्या बापानें मला जोडे मारून हाकलून दिलें हें खोटें असलें, तरी " जोडे मारीन " असें ते म्हणाले हें खरें आहे. तिची मागणी करण्यासंबंधानें वाममार्ग न स्वीकारतां सरळ तिच्या वडलांकडे जाऊन विचारावें म्हणून मी त्यांच्याकडे गेलों, पण कोणीतरी त्यांचें मन माझ्याबद्दल कलुषित करून ठेविलें होतें म्हणून त्यांनीं मला गेल्याबरोबर " कोण पाहिजे " म्हणून कठोर स्वरानें विचारलें. " आपणालाच भेटायला आलों आहें " असें मी म्हटल्यावर, " खोटें बोलत आहांत, तुम्हांला माझ्या इंदूला भेटावयाचें आहे " असें ते बोलूं लागले आणि माझें ऐकूनच घेईनात, तेव्हां मी कांहीं अधिकउणें बोललों त्यामुळें स्वारी चिडली आणि " चालते व्हा इथून, एक शब्द अधिक बोलाल तर जोडे मारीन " असें म्हणून म्हाताऱ्यानें खरोखरच दाराजवळचा जोडा उचलला! मला त्यावेळींच जोडा मिळावयाचा पण मी तेथून लगेच निसटलों म्हणून त्यावेळीं मिळाला नाहीं. पण अखेर मिळालाच! कारण त्याच दिवशीं घरीं येऊन शांतचित्तानें त्यांना पत्र लिहिल्यावर आणि घरांत इंदूशीं त्यांचें बोलणें झाल्यावर, चार दिवसांतच इंदुमती–सूर्यकांताचा जोडा लक्ष्मी–नारायणाप्रमाणें शोभेल अशी भाषा त्यांच्या घरांत सुरू झाली!

आतां आम्हीं सकाळीं किंवा संध्याकाळीं सर्वांच्या संमतीनें फिरावयास जातों व हरतऱ्हेच्या गोष्टी मोकळेपणानें आणि न लाजतां बोलतों. वाटेंत कोणी मित्र किंवा मैत्रिण भेटली म्हणजे लाजल्यासारखें होतें, आणि त्यांचीं विशिष्ट अभिप्रायानें म्हटलेलीं विनोदगर्भ वाक्यें ऐकून तर फारच संकोच उत्पन्न होतो. पण त्यांतहि मौज आहे!

आमच्या बरोबर आमची सरला कधीं कधीं असते. तिचें आणि इंदूचें पटेल असें दिसत नाहीं. इंदु गरिबाची आहे आणि सरला श्रीमंत आहे; इंदु जरा नटवी आहे, सरला साधी "भोळी" आहे; इंदु भोगप्रिय आहे, सरलेला भोग अप्रिय नसला तरी जात्या ती त्यागप्रिय आहे. अर्थात् इंदूला आपण सर्व तऱ्हेनें सरलेपेक्षां कमी आहों असें वाटतें. अर्थात् तिच्या मनांत न्यून-गंड (inferiority complex) उत्पन्न झाला आहे. सरलेच्या मनांत असाच "अहं-गंड" (superiority complex) झाला असावा. ('न्यून-गंड' व 'अहं-गंड' हे चमत्कारिक शब्द आपले मित्र वा. म. जोशी यांचे आहेत, हें आपण ओळखलेंच असेल.) शिवाय आपल्या घरांत आतां इंदु येऊन घरमालकिणीप्रमाणें वागणार आणि आपण ल्हानपणापासून ज्या घरांत वाढलों त्या घरांत आपला दर्जा कमी होणार हें सरलेच्या मनांत येत असावें. कांहींहि असो, इतर नणंदा-भावजयांप्रमाणेंच या सुशिक्षित (?) नणंदाभावजयांचें पुढें पटणें कठीण दिसतें. माझ्या सध्यांच्या प्रेममय सुखकर वातावरणांत कोणतें शल्य असेल तर हेंच. इंदूचें आणि सरलेचें पटलें नाहीं आणि सरलेचें मन दुखवण्याची पुढें मागें मला पाळी आली तर मला जीव धावासाच वाटेल. इंदु, तूं वाटेल तें कर, पण हा प्रसंग माझ्यावर आणूं नकोस!

मी इंदूला पत्र लिहीत नाहीं, विनायकरावांना लिहीत आहें हें विसरलोंच. आपण सत्याग्रहाश्रमाचें वर्णन न करतां या आश्रमासंबंधीं वा. म. जोशी यांचा "लोकसेवक"मध्यें आलेला एक लेख वाचण्यास मला सांगितलें त्याप्रमाणें तो त्यांचेकडून मागून घेऊन वाचला. **तुमचें** पण मत काय आहे आणि **तुमचा** ग्रह काय झाला हें मला पाहिजे आहे; जोशी यांचीं मतें मला माहीत आहेत.

विलायतेस जाण्याचा बेत रहित करणार असें सरलेकडून समजतें. चूक करीत आहांत. तुम्ही आणि सरला यांच्यासारख्या बुद्धिमानांनीं तिकडे वास्तविक जावें. त्यांत तुमचा आणि देशाचा फायदा आहे. आमच्या-सारख्या परीक्षा–पंढरीच्या वारकऱ्यांनीं जाऊन काय करावयाचें आहे?

"बी. ई." पास होण्यास मला किती वर्षें लागलीं ठाऊक आहे ना? इंदूला विलायतेस जाण्याची इच्छा आहे, पण प्रीव्हियसच्या गणितानें जिला दोन वर्षें गोता दिला, तिला ऑक्सफर्ड-केंब्रिजमध्यें कपबशा धुणारी वेट्रेस या नात्यानेंच प्रवेश मिळूं शकेल. (तिला हें माझें मत सांगूं कळवूं नका. सरलेलाहि सांगूं नका.)

आपले मित्र नारायणराव पाठक मधून मधून भेटतात. एम्. ए. चा अभ्यास करण्याचें स्वारीनें सोडलेलें दिसतें. त्याचप्रमाणें त्यांच्या "साखरपें" गांवच्या बालमैत्रिणीबद्दलच्या प्रेमकथाहि आतां फारशा ऐकूं येत नाहींत. आतां जुन्या बखरी, जुनीं पत्रें, याद्या, करीणे, तहनामे, तिथि आणि तारखा यांच्या जंत्र्या, ग्रॅन्ट डफच्या चुका, 'तपस्वी' राजवाड्यांची बुद्धिमत्ता, खऱ्यांचा स्वार्थत्याग, सरकारची व जनतेची अनास्था इत्यादिकांचा माझ्यावर संभाषणाच्या वेळीं इतका मारा होतो, कीं पुढेंमागें सीतेला घरीं ठेवून राम जसा वनवासाला जाण्यास सिद्ध झाला, तसा मी देखील प्रियतम इंदूला बाजूस ठेवून इतिहासाच्या रुक्ष प्रदेशांत शिरून ग्रॅन्ट डफ वगैरे राक्षसांचा संहार करण्यास सिद्ध होईन असें वाटूं लागलें आहे.

आपला मित्र

**भाऊ काळे**

---

## [६] उच्च आनंद व दुःख

सत्याग्रहाश्रम, साबरमती.

ता. ११-६-२१

प्रियपत्नी सरला हीस आशीर्वाद विशेष,—

भाऊ व इंदु गुप्ते यांच्या विवाहाला मी हजर नव्हतों म्हणून वाईट वाटतें. पण माझ्याबद्दल कोणीहि गैरसमज करून घेणार नाहीं अशी खात्री वाटते.

अतिशय आनंदाची आणि अत्यंत दुःखाची गोष्ट तुला एक सांगावयाची आहे. ती ही कीं मी गांधींच्या निशाणाखालीं देशाकरितां

अनत्याचारी लढाई करणारा शिपाई झालों आहें. हा निश्चय केल्यापासून मला इतका आनंद होत आहे, कीं तुझ्या संगतींत वर्षभर घालविलेले आनंदाचे दिवस मला अगदीं क्षुद्र आनंदाचे वाटत आहेत. दुःख एवढ्याच-करतां होतें, कीं माझ्यामुळें तुला दुःख होणार. तूं सीता–सावित्रीसारखी किंवा गडकऱ्यांच्या सिंधूसारखी आहेस म्हणून दुःख तीव्रतर होतें. तूं वाईट असतीस आणि माझा त्याग केला असतास तर मी सुटलों असतों. पण चंद्राला एखादवेळेस चंद्रिका सोडून जाईल, सज्जनाची सुजनता एखादे वेळेस त्याला विसरून जाईल, माता एक वेळ प्रिय अर्भकाला टाकून जाईल, पण सुशील पत्नी आपल्या पतीचा त्याग करणार नाहीं. हें सगळें चांगलें आहे, पण मला आतां तें दुःखदायक होत आहे. सृष्टीची योजना कदाचित् चांगलीहि असेल, कारण मी जर चुकत असलों तर मला मार्गावर आणण्याला तुझ्याशिवाय कोण आहे ?

वरील सुखदुःखें उच्च वातावरणांतलीं आणि हृदयाच्या खोल गाभ्यांतलीं आहेत. हृदयाच्या वरच्या पापुद्र्यावरील दुःखाची एक गोष्ट तुला सांगाव-याची म्हणजे ती अशी, कीं इन्दु गुप्ते (अथवा आतां इन्दु काळे) हिच्याशीं तुझें नुकतेंच भांडण झालें हें ऐकून मनाला बरें वाटलें नाहीं. कांहीं तरी, कोणाचा तरी, कोठें तरी, गैरसमज झाला आहे हें माझें नेहमींचें म्हणणें मी सोडलेलें नाहीं आणि म्हणून मी तिला किंवा तुला दोष देत नाहीं. तरी पण खुलाशाचें मला इकडे पत्र पाठवावें. आणि गैरसमज कोठें असेल तो दूर करून टाकावा. नणंदाभावजयांचें पटणें शक्यच नाहीं का ?

मला आतां गुजराथी चांगलें बोलतां येऊं लागलें आहे. सांख्यकारिका व भगवद्गीता यांसंबंधीं मी एक टांचण तयार केलें होतें तें एका गुजराथी मासिकांत छापवून घेतल्यामुळें, गुजराथमध्यें मी काका कालेलकरांप्रमाणें विद्वानांत गणला जाऊं लागलों आहें ! मला लवकरच बार्डोलीच्या सत्याग्रहासंबंधीं एका तालुक्यांत कांहीं कामगिरीवर जावें लागेल.

तुझा

**विनायक भोळे**

## [७] अमावास्येच्या कडेवर बालचंद्र

काळे यांचा वाडा,
नारायण पेठ, पुणें.
ता. २०–७–२१.

प्रियपतीचे चरणीं सा. न. वि. वि.

आपण बार्डोलीच्या सत्याग्रहांत शिरणार ही "उच्च आनंदाची आणि दुःखाची" बातमी लिहिली ती वाचून आपल्याप्रमाणेंच उच्च आनंद आणि दुःख झालें. आनंद अशाकरितां कीं आपलें मन मोकळें करून लिहिण्याइतक्या योग्यतेची मी वाटतें, आणि दुःख अशाकरितां कीं माझ्यावरचा विश्वास अद्यापि अपुरा आहे. मी व्यावहारिक दृष्टीची आहें (आणि कोणती स्त्री नसते?); पण आपल्या उच्च आकांक्षांना पायबंद करणारी मी नाहीं. पुढील अडचणींचीं, आपत्तींचीं, लोकांनीं केलेल्या फसवणुकींचीं, देशभक्त म्हणविणारांनींच केलेल्या निंदेचीं आणि लुच्चेगिऱ्यांचीं वगैरे माझ्या व्यावहारिक दृष्टीला स्पष्ट चित्रें दिसत आहेत. "तुझा अनुभव तो काय आणि व्यावहारिक गोष्टी मला तूं शिकवतेस ती काय?" असें नेहमींप्रमाणें म्हणाल हें मी जाणून आहें आणि तें खरेंहि आहे. पण मी वयानें लहान असलें तरी बारिकसारीक गोष्टींत तरी माझेंच म्हणणें पुष्कळदां खरें ठरलें आहे आणि आपण (थोर मनानें किंवा थोरपणाला शोभणाऱ्या दुर्लक्षामुळें) केलेल्या चुका निस्तरण्याला माझी 'बायकी' बुद्धीच पुष्कळदां उपयोगी पडलेली आहे, हें आठवतें ना? हें जरी खरं असलं तरी उच्चतम क्षेत्रांत आपण माझ्यापेक्षां अधिक ज्ञाते आहांत आणि आपलें मन माझ्यापेक्षां अधिक उदार आणि उदात्त आहे हें मी जाणतें आणि म्हणून मला आपलें कौतुक वाटतें आणि आपली सेवा करण्याचा अधिकार मला जो मिळाला आहे त्याबद्दल धन्यता वाटते. अर्थात् सत्याग्रहांत जाणें न जाणें हें आपण आपल्या बुद्धीनें ठरवावें. मी आपणांला त्या बाबतींतहि मदत करीन. अधिक काय लिहूं?

## इंदु काळे व सरला भोळे

आतां इंदुवहिनींबद्दल लिहावयाचें, पण त्याच्या आधीं एक गोष्ट सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. पण ती नाजुक आहे, आणि सांगावी कशी हा प्रश्न आहे, आणि अशा वेळीं काव्यशक्तीची जरूर भासते.

डोकें खाजवून आणि पांच मिनिटें थांबून एक दोन कल्पना सुचल्या आहेत त्या सांगतें. आपण दोघेंजण गप्पागोष्टी बोलत असतां मध्यें तिसरें कोणी आलें म्हणजे बरें वाटत नसे. पण आतां तसें चालणार नाहीं हो ! आतां आपल्या दोघांमध्यें कोणी तरी तिसरें हक्कानें येऊं पहात आहे. पुरुषी डोक्यांत अर्थबोध होत नसेल अशी खोटी कल्पना करून घेतें आणि डोकें खाजवून काढलेली आणखी एक कल्पना फुकट जाऊं नये म्हणून तीहि सांगून टाकत्यें. लोक आपणाला सूर्य आणि मला अमावास्या म्हणतात. म्हणोत बिचारे. पण सृष्टींतल्या अमावास्येच्या कडेवर बालचंद्र ( किंवा बालचंद्रकला ) शोभायमान झालेली दिसली आहे का ? नाहीं ना ? पण हा चमत्कार लवकरच मानवी अमावास्या करून दाखविणार आहे आणि सृष्टीपेक्षां मानवी कला श्रेष्ठ असें आमचे प्रोफेसर सांगतात तें सोदाहरण सिद्ध करून देणार आहे !

आतां इंदुवहिनींचं आणि माझं भांडण ! आपण लिहिलें कीं गैरसमज दूर करून टाकावा. बरोबर आहे. गैरसमज दूर करून घेणें हातीं आहे, कारण भांडण झालें आहे हाच गैरसमज आहे ! गैरसमज करून घेऊन लोकं कशीं भांडतात याचें वर्णन करून हंसणारे आपण 'भांडण झालें' असा गैरसमज करून घेऊन दुःख करतां, हें पाहून माझ्या विनोदशून्य मनाला देखील हंसण्यासारखें कांहीं दिसतें ! आतां एवढी गोष्ट खरी, कीं आमचीं मनें जेवढीं असावींत तेवढीं शुद्ध नाहींत. या बारीक–सारीक गोष्टी पत्रांत किती आणि कशा लिहिणार ?

आपली सदैव सेविका,

**सरला**

ता. क.—

नारायणराव पाठक हे इकडे आल्यास आपलें एखादें पत्र दाखवत्यें. आपण सत्याग्रहांत पडावें किंवा नाहीं याबद्दल ते आपल्या स्वभाव-धर्माप्रमाणें कांहींच निश्चित बोलत नाहींत !

---

## [ ८ ] लेका बोले, सुने लागे

काळे यांचा वाडा,
नारायण पेठ, पुणें.
ता. २२-८-२१.

चिरंजीव भाऊ यास त्याच्या वडिलांचे अनेक आशीर्वाद, विशेष.

वास्तविक मी जें लिहिणार आहें तें मला समक्ष सांगतां आलें असतें तर बरें झालें असतें. लिहिण्यानें क्षुल्लक गोष्टींना भलतेंच महत्व येतें, हें खरें; पण समक्ष बोलतांना कदाचित् माझ्या तोंडून किंवा तुझ्या किंवा सूनबाईच्या तोंडून उगाच एखादा अधिक उणा शब्द निघून जावयाचा म्हणून पत्र लिहीत आहें. या पत्रांतील गोष्टी तुला समजत आहेत, पण तूं सून-बाईला समजावून सांगाव्यास अशी इच्छा आहे. सूनबाईच्या मनांत बरेच गैरसमज आहेत. ते वेळींच दूर झाले पाहिजेत. दुष्टपणापेक्षां गैरसम-जानेंच संसारांत अधिक दुःखें उत्पन्न झालेलीं आहेत ! लोकांच्या संबंधांत गैरसमजामुळें उत्पन्न झालेले घोंटाळे पाहिले म्हणजे मला हंसूं येत असे. पण आतां माझ्याच कुटुंबांत हा राक्षस शिरला आहे तें पाहून रडूं येण्याची पाळी आली आहे ! असो. पहिली गोष्ट अशी कीं तुझी आई सूनबाईला दुपारच्या सैंपाकाला हात लावूं देत नाहीं यामुळें ती रागावलेली दिसते. मी स्वतः पक्का सुधारक आहें आणि तूं आणि सरलाहि सुधारक आहांत; पण जुन्या बायकांचीं मनें एकदम कशीं बदलणार ? ब्राह्मण-प्रभु अशा मिश्र विवाहाला तिनें परवानगी दिली हेंच तुझें आणि माझें नशीब. शिवाय ती संध्याकाळची आपली दशमी करून ठेवते आणि संध्याकाळचा सैंपाक

सगळा सूनबाईच्या स्वाधीन करते, या तिच्या स्वार्थत्यागाला कांहींच किंमत नाहीं का ? दुपारींहि चटण्याकोशिंबरी वाढणें सूनबाईच्याकडे दिलेलें आहे यांत तिनें पुढें पाऊल टाकलेलें नाहीं काय ? सूनबाईला आणखी एक मुद्दा समजावून सांग. तिची सासू आतां किती दिवस जगणार आहे ? भाऊ, तूं सगळें जाणत आहेस. तिचा आजार बरा होण्यासारखा नाहीं...मला अधिक लिहवत नाहीं. सर्व गोष्टी ईश्वराच्या इच्छेप्रमाणेंच होणार !

दुसरी गोष्ट सरलेला काम न सांगतां सूनबाईला तुझी आई काम सांगते आणि एकंदरींत पक्षपात करते. या बाबतींत देखील सूनबाईनें सारासार विचार करावा. आधीं घरांत काम करण्यास नोकरचाकर आहेतच तेव्हां कामाची तक्रार नसावी. दुसरं असं कीं सरला माहेरवाशीण आहे आणि जुन्या पद्धतीप्रमाणें तिला कांहीं अधिक सवलती मिळणारच. मिळा-व्यात किंवा नाहीं हा प्रश्न निराळा. पण अशी ही जनरीत तरी आहे. सूनबाई माहेरीं गेल्यावर तिची आई कशी वागते याचा विचार करण्यास तिला सांग. कोठल्याहि आईबापांना आपलीं मुलें अधिक असतात. गाय आपल्या वासरांना चाटते तशी इतर वासरांना चाटील काय? सागराला आपलं अपत्य जो चंद्र त्याच्या दर्शनानें जशी आनंदाची ऊर्मि येईल तशी नक्षत्रें, तारका वगैरे पाहून येईल का ?

तिसरी गोष्ट अधिक नाजुक आहे. सूनबाईंना गाण्याबजावण्याची आवड आहे हें कांहीं वाईट नाहीं. पण गाणीं म्हणण्यांत आणि पेटी वाज-विण्यांत वेळ किती दवडावयाचा ? आणि या कला शिकविणाऱ्याबरोबर वेळ किती घालवावयाचा ? सूनबाई वाईट आहे किंवा होईल असें मला म्हणावयाचें नाहीं, त्याप्रमाणेंच बिन्दुमाधव म्हस्कर हे गायनमास्तर वाईट आहेत असेंहि मात्र म्हणावयाचें नाहीं. पण या पद्धतींत धोका आहे, हें मला सांगावयाचें आहे. काय असेल तें असो, गाण्या–बजावण्यानें भावनावशत्व येतें ही गोष्ट खरी. सूनबाई चांगली आहे, पण मास्तरांच्या मनांत कधींच पाप येणार नाहीं असें आहे का ? गाणें–बजावणें शिकावें, पण हरतऱ्हेच्या मर्यादा पाळाव्यात. एकांत करूं नये,

बरोबर कोणी घेतल्याशिवाय कलाशिक्षकाबरोबर वारंवार फिरण्यास जाऊं नये, वगैरे वगैरे. या गोष्टी समक्ष सांगण्याचें मला धैर्य होत नाहीं, पण तूंच जर शांतपणें, मन कलुषित होऊं न देतां, या गोष्टी समजावून दिल्यास तर उत्तम होईल. तूं आतां आपल्या कंत्राटाच्या धंद्याच्या निमित्तानें बाहेर असतोस, तेव्हां सूनबाईला मनोरंजनाकरितां गाणें वगैरे पाहिजे हें मला समजतें. पण धोक्याची सूचना देऊन ठेविली आहे. मनुष्य हा जितका चांगला आहे तितका वाईटहि आहे. मोठमोठे मोह तो बाजूला सारील, पण एखादा क्षण असा येतो कीं कांहीं तरी होऊन तो भलत्याच मोहाला बळी पडतो आणि अब्रूचा नाश करून घेतो !

इतके दिवस माझे सुखांत गेले. सरकारी नोकरी मिळाली, श्रीमंती आली, मुलेंबाळें उत्तम झालीं, जांवई चांगला मिळाला. मुलाला आवडती आणि चांगली पत्नी मिळाली. (ती फार चांगली आहे असेंच माझें मत आहे.) पण जिच्याबरोबर मी वयाचीं पन्नासांहून अधिक वर्षें अत्यंत सात्त्विक आनंदांत घालविलीं ती माझी सहधर्मचारिणी मृत्यूच्या मार्गाला लागली आहे; जांवई गांधींच्या सत्याग्रहांत पडून दारिद्र्यांत राहूं पाहतात आणि लवकरच तुरुंगांत जाण्याच्या तयारींत आहेत; सूनबाईच्याबद्दल लग्न झाल्यानंतर लवकरच लोकापवाद सुरू झाले आहेत; घरांत भांडणें नसलीं तरी कानांवर मधून मधून ऐकूं येणारी कुजबुज आहे; आणि मुलगा कंत्राटांमध्यें पैसे मिळवीत असला आणि उत्तम असला तरी त्याच्या बायकोबद्दल त्याला पुढेंमागें खरेखोटे लोकापवाद ऐकावे लागणार आहेत— असा हा देखावा दृष्टीसमोर आणला म्हणजे लवकर डोळे मिटावेत अशी इच्छा उत्पन्न होते !

विनायकराव सत्याग्रहांत पडावें म्हणतात. त्यांना ६००० रु. देण्याचें मीं योजिलें होतें ते देऊन टाकावेत आणि पुढें कांहीं अपेक्षा करूं नये असें लिहावें म्हणतों. लिहिणें कठोर आहे, पण लिहिलें पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे कीं त्यांना मी पुढें कांहीं मदत करणार नाहीं, पण माझ्या स्वभावा-प्रमाणें या बाबतींत स्पष्ट सूचना देणें बरें वाटतें. त्यांना तूंच पत्र लिही.

मी सरकारी पेन्शनर असल्यामुळें ते सत्याग्रहांत पडल्यावर त्यांच्याशीं मला कितपत संबंध ठेवतां येईल हा प्रश्नच आहे हेंहि सुचवून ठेव.

"लेकी बोले सुने लागे" या म्हणीप्रमाणें तुझी आई वागते आणि सुनेला सुधारूं पाहते. मी लेकाला पत्र लिहून सुनेला उपदेशाच्या चार गोष्टी सांगत आहें. सुनेला सुधारणें हाच दोघांचा हेतु, पण मार्ग मात्र भिन्न.

तुझे वडील,
**अप्पा**

ता. क.—

सहज गोष्ट आठवली म्हणून पत्रांतच लिहितों. तुझ्याकडे नारायणराव पाठक म्हणून तुझे मित्र येत असतात त्यांची लग्न करण्याची इच्छा आहे काय? माझ्या एका ओळखीच्या गृहस्थाची मुलगी लग्नाची आहे. हे गृहस्थ त्यांच्या ओळखीचे आहेत. आणि मुलगीहि त्यांनीं पाहिलेली आहे. लग्नाची इच्छा असल्यास मी आपल्या मित्रांना पुढील मार्गाला लागण्यास सांगतों.

**अप्पा**

---

## [९] कलाप्रेम आणि नैतिक कल्पना

काळे यांचा वाडा,
नारायण पेठ, पुणें,
ता. २५–८–२१.

रा. रा. बिंदुमाधव म्हसकर, गायन मास्तर यांस,

इंदु काळे हिचा नमस्कार वि. वि. आपण शिकवणीच्या वेळेशिवाय मला भेटण्यास येऊं नये. आपण आल्यावर मला नाहीं म्हणवत नाहीं, आणि वेळेचें भान न राहतां आपण फार वेळ बोलत बसतों, हें घरांत

आवडत नाहीं आणि तें बरोबरहि आहे. आपल्याबद्दल माझें मन कलुषित नाहीं, पण लोकापवादाला भ्यालें पाहिजे.

कलाप्रेम आणि सांकेतिक नीतिकल्पना यांचा झगडा नेहमीं चाललेला असतो असें आपण नेहमीं म्हणत असतां तें आतां चांगलें प्रत्ययाला आलें. माझें कलाप्रेम मला गुंडाळून ठेविलें पाहिजे आणि आपल्याशीं बोलण्याचालण्यांत कितीहि आनंद वाटत असला आणि आपल्याबद्दल कितीहि आदर वाटत असला तरी परंपरागत रूढ चालरीत पाळलीच पाहिजे. नैतिक तारेच्या सुराशीं कलेच्या तारेचा सूर जर जुळला नाहीं, तर जीविताची सतार बदसूर वाजूं लागेल आणि कोणालाच कांहीं आनंद व्हावयाचा नाहीं. कळावें.

आपली कलाशिष्या,

**इंदु काळे**

---

## [ १० ] लोकापवादाची झळ

काळे यांचा वाडा,
नारायण पेठ, पुणें.
ता. १-९-२१

सरला भोळे हिचे पतिचरणीं अनेक नमस्कार वि. वि.

येथील सर्व मंडळी खुशाल आहेत. "खुशाल" म्हणजे शारीरिक दृष्ट्या. आणि शारीरिक दृष्ट्या पाहिलें तरी "आई" ही अपवाद आहे. तिचें वजन कमी होत आहे आणि ती दिवसेंदिवस खंगत चालली आहे. शारीरिक रोग, अपचन, क्षय किंवा काय जो असेल तो आहेच, आणि शिवाय आपण सत्याग्रहांत शिरल्यामुळें आपली व माझी काळजी. त्यांत पुनः इंदुवहिनीबद्दलच्या कंड्या आणि त्याबद्दलच्या काळजीची भर !

इंदुवहिनींबद्दल कंड्या आहेत त्या साफ खोट्या आहेत, पण त्या दुःख देतातच. पतिपत्नींच्या मनांत संशय उत्पन्न होणें हें जसं दुःखदायक

(संशय साधार आहे का निराधार आहे हा प्रश्न गौण आहे) त्याचप्रमाणें लोकापवादाचं आहे. कादंबऱ्यांतले नायक आणि त्यांच्या नायिका यांचा आणि आपला कांहीं संबंध नसतो, हीं सर्व काल्पनिक आहेत असं आपणाला पक्कं ठाऊक असतं, तरी देखील त्यांचीं दुःखं पाहून आपणाला वाईट वाटतं, तसंच स्वकीयांबद्दलचे अकीर्तिकारक जनापवाद खोटे आहेत असं जरी ठाऊक असलं तरी दुःख होतें; कारण हा असा मनुष्यस्वभाव आहे. खऱ्याखोट्याचा येथें संबंध नाहीं. आपल्या स्वतःबद्दल किंवा स्वकीयांबद्दल लोक कांहीं कुजबुजत असतात ही जाणीव ज्याला जाचक होत नाहीं तो पशु किंवा मुक्तच समजला पाहिजे.

आपण सत्याग्रहांत शिरणार आणि लवकरच सरकारचे पाहुणे होणार याबद्दल मी अभिमान बाळगूं का शोक करूं ? आपल्या उच्च ध्येयांबद्दल अभिमान वाटतो, पण मी आपली हिंदु स्त्री आहें. मी आपले पाय मागें ओढूं इच्छीत नाहीं, (आणि ओढले तरी आपण मलाच ओढीत न्याल, पण मागें येणार नाहीं हें मला माहित आहे आणि म्हणूनच मला आपल्याबद्दल अभिमान वाटतो!) पण मी आपलं मन आपल्याजवळ नाहीं तर कोणाजवळ मोकळं करून सांगूं ?

अप्पा हल्लीं आईच्या आजारामुळें आणि एकंदर परिस्थितीमुळें वैतागलेले आहेत. बिचाऱ्यांना सगळीं दुःखं गिळून वर पुनः आनंदाचें सोंग घ्यावें लागत आहे, कारण त्यांनींच जर धीर सोडला तर मग इतरांनीं काय करावं ?

आईनें आशीर्वाद लिहिण्यास सांगितलें आहे. भाऊ कंत्राटें मिळविण्याच्या व मिळविलेलीं पुरीं करण्याच्या धांदलींत असतो. त्याला कधींहि स्वस्थपणा नाहीं. वहिनींवर अलोट प्रेम आहे आणि तिच्या कलाप्रेमाचें कौतुक करावेंसें त्याला वाटतें. पण अलीकडे लोकापवादांमुळें गांगरून गेला आहे आणि कसें वागावें याबद्दल तो बुचकळ्यांत पडलेला दिसतो.

वहिनींबद्दल त्याच्या मनांत गैरसमज उत्पन्न झाला तर मग दुःखाचा कळसच होईल. गैरसमजानें संसारांत अनेक आपत्ति उत्पन्न होतात, पण पतिपत्नींमधला गैरसमज म्हणजे सामान्य आपत्ति नव्हे. ही आपत्ति टाळण्याचा मी प्रयत्न करीत आहें. माझ्याबद्दलची वहिनींची अढी राहिली तरी चालेल, पण हा गैरसमज फारच भयंकर. कळावें.

आपली पत्नी,
**सरला भोळे**

---

## [ ११ ] तूं माझी 'कस्तुरी' आहेस

बारडोली,
ता. १०-९-२१.

सुशील पत्नी सरला हीस,

आशीर्वाद विशेष. मी येथें चार दिवसांपूर्वी आलों. लवकरच जेलखान्याचा रस्ता सुधारावा लागेल. पण गांधींना अल्पस्वल्प कां होईना मदत करण्यांत अतिशय आनंद होतो. राजकारणाच्या क्षेत्रांत त्यांच्याहून भिन्न पण स्फूर्तिदायक व उचित असा मार्ग दाखविणारा कोणी दुसरा लायक नायक नाहीं हें एक; आणि एकदा राष्ट्रानें एखाद्याला नायक म्हटलें म्हणजे शिपायाप्रमाणें त्याच्या आज्ञा सगळ्यांनीं पाळाव्यात, नाहीं तर मोठीं कार्यें होणार नाहींत, अशी माझी खात्री झाली आहे हें दुसरें; तसेंच व्यक्तिदृष्ट्या त्यांचेबद्दल मला अत्यन्त आदर आहे हें तिसरें या तीन गोष्टींचा विचार केल्यास मी स्वतःच्या विचारांना कां बाजूस सारतों हें ध्यानांत येईल. ( माझीं ध्येयें आणि माझे मार्ग तुला कोठें मान्य आहेत ? पण तूं माझी एकनिष्ठपणें भक्ति करीत आहेसच, तेव्हां माझ्या वर्तनाचें इंगित तुला सहज समजेल. )

गोष्ट ओघाला आली म्हणून लिहितों. गांधींच्या पत्नी कस्तूरबा या गांधींइतक्या मोठ्या योग्यतेच्या नाहींत. बाहेरच्या लोकांनीं कांहीं म्हटलें

तरी मी अंतःस्थ गोष्टी आश्रमांत राहिल्यामुळें जाणतों. त्यांना गांधींचीं सगळीं ध्येयें पूर्णपणें पसंत नसलीं तरी त्या सुपत्नी असल्यामुळें पतीच्या शब्दाबाहेर यत्किंचित् जात नाहींत. त्यांचा कमीपणा नव्हे तर त्यांचा मोठेपणा सांगण्याकरितां त्यांची स्वतःची वृत्ति सांगितली. गांधींपेक्षांहि त्या एका अर्थी मोठ्या आहेत. स्वतःची वृत्ति भिन्न असतां पतीकरितां एवढा मोठा स्वार्थत्याग करणारी पत्नी मी फार मोठी समजतों. तूं असेंच वागावेंस म्हणून मी लिहिलेलें नाहीं. पण मी स्वतःला छोटा गांधी समजलों तर तूं माझी " कस्तुरी " आहेस आणि एका अर्थी माझ्यापेक्षां तुझा स्वार्थत्याग मोठा आहे असें सांगण्याकरितां मी हें लिहिलें आहे.

तुझ्या भाऊचें मन चिंताव्यग्र झालेलें दिसतें. इंदुवहिनी तुझ्याबद्दल त्याचें मन कलुषित करूं पाहते हें एक त्याला मोठें शल्य आहे. दुसरें शल्य म्हणजे इंदुवहिनीच्या चारित्र्याबद्दल संशय. लोकापवाद त्याच्या कानावर गेले आहेत. इंदु सौंदर्यामुळें आणि कलाकुशलतेमुळें त्याच्यापेक्षां लोकांत अधिक प्रसिद्ध आहे म्हणून त्याला लोक " मिस्तर इंदू " म्हणतात हें कांहींच नाहीं. असल्या बोलण्यांत उगीच कांहीं तरी विनोद करावयाचा असतो हें तो ओळखून आहे आणि तोच स्वतःला मित्रमंडळींत " मिस्तर इंदु " म्हणून म्हणवून घेतो. त्यानें एका पत्रांत मला पुढील गोष्ट लिहिली आहे. नवीनच आलेल्या एका फाजील पेन्शरानें टेनिस क्लबावर " का हो मिस्तर भाऊराव, बिन्दुमाधव म्हस्करांबरोबर फिरावयास जातांना कधीं कधीं दिसतात त्या त्यांच्या पत्नी का हो ?" असें मिस्किलपणें त्याला विचारलें आणि दुसऱ्या एका साथीदारानें त्याची चूक तितक्याच साळसूदपणानें लक्षांत आणून दिल्यावर " चुकलों बरं का भाऊराव, क्षमा करा " म्हणून सगळी गोष्ट हंसण्यावारी नेली ! भाऊनेंहि त्यावेळीं गोष्ट हंसण्यावारीच नेली, पण ती त्याला शल्याप्रमाणें बोचत आहे असें त्याच्या पत्रावरून दिसतें. बरें, या गोष्टी कोणाजवळ बोलतां येत नाहींत. तोंड दाबून बुक्क्यांचा मार. इंदूजवळहि त्या बोलतां येत नाहींत; कारण फायदा

न होतां उलट तिच्या दुःखांत भर घालण्याचें श्रेय मिळवयाचें. इंदूवर त्याची अतिशय भक्ति आहे, तिचें कोडकौतुक करण्यांत त्याला आनंद होतो, लोकापवादाला तो भीत नाहीं, पण अलीकडे त्याचें मन द्विधा होऊं लागलेलें दिसतें. तूं त्याच्या चित्ताला शांति मिळेल असें कांहीं करूं शकशील काय ? का मी तिकडे एकदां येऊं ? मनांत आणलेंस तर इंदूचें प्रेम आणि तिचा विश्वास तुला आपलासा करतां येणार नाहीं असें नाहीं. निश्चयपूर्वक त्या मार्गाला लाग.

नारायणराव पाठकांना काशी ढवळे ही मुलगी सांगून आली होती त्याचें काय झालें ? तिच्यावर त्याचें प्रेम आहे हें मला त्यांच्याकडूनच किती दिवस तरी ठाऊक आहे. प्रेमपाशांत न सांपडतां इतिहास-संशोधन करण्याचा त्यांचा विचार दिसतो. चुकत आहेत. कळावें हे आशीर्वाद.

तुझा प्रिय पति,

**विनायकराव**

---

## [ १२ ] मनांतलें विष अखेर बाहेर पडलेंच

पुणें,

ता. १०–९–२१.

मित्रवर्य विनायकराव भोळे यांस भाऊचा साष्टांग नमस्कार विनंति विशेष.

मनःस्थिति फार वाईट झालेली आहे. आपण एकदां येऊन जावें.

इंदूबद्दल सरलेला माझ्याशीं कांहीं बोलावयाचें आहे असें तिच्या आविर्भावावरून आणि अर्धवट सोडलेल्या वाक्यांवरून दिसतें. पण ती बोलत नाहीं. सांगावें का न सांगावें अशांतलें कांहीं गुह्य दिसतें.

मी इंदूला ४ दिवसांपूर्वी स्पष्टपणें विचारलें कीं बिंदूमाधव म्हस्करांची शिकवणी बंद करणें इष्ट नाहीं का ? त्याचीं विवाहसंस्थेबद्दलचीं मतें रशिआंतल्या बोल्शेविक लोकांसारखीं आहेत, त्याच्या चारित्र्याबद्दल

पुष्कळ वाईट गोष्टी ऐकिवांत आहेत. त्याच्या संगतीमुळें तुझेंहि नांव बद्दू होत आहे, वगैरे गोष्टी मी सांगितल्या. पण ती म्हणाली कीं लोकापवादांना मिथ्याचें कारण नाहीं. मी बोलतां बोलतां सहज म्हटलें कीं "म्हस्कर हे पेटी चांगली शिकवितात, त्यांचीं मतें कांहीं असलीं तर त्यांचें बोलणें-चालणें चांगलें असतें इतकेंच नाहीं तर मोहकहि असतें." ती हंसली आणि म्हणाली, "होय, मोहक असतें खरें." "त्यांचें पेटीवादनच नव्हे तर तेहि तुला मोहक वाटत असतील." मी म्हटलें.

"हो, तेंहि खरें आहे." ती म्हणाली.

"त्यांच्याबद्दलचा मोह मर्यादेपलीकडे जात चाललेला नाहीं ना?" मी विचारलें, "जात चालला असला तरी मी तो आवरूं शकेन असें वाटतें. ज्या दिवशीं मला त्यांच्याशीं प्रेमसंबंध ठेवावासा वाटेल, त्या दिवशीं मी आपणाला सांगून वेगळी राहीन; पण आपणाला फसवून भलतें कांहीं करणार नाहीं. विवाहाबद्दलच्या जुन्यापुराण्या कल्पना मी केव्हांच सोडल्या आहेत, पण पतीला फसविणें हें मी पाप समजतें. पति आवडेनासा झाल्यास घटस्फोट करणें हें पाप नव्हे तर तें कर्तव्यकर्म मानतें."

अशा प्रकारची तिची भाषा ऐकल्यावर तिच्याबद्दल मला आदर वाटूं लागला आणि हिचा संशय घेऊन पेटीवादन तूं शिकूं नकोस असें सांगणें म्हणजे स्वार्थी प्रेमानें निर्जीव पण रूढ झालेल्या नीतीच्या नांवाखालीं जिवंत कलोपासनेची गळचेपी करण्यासारखें आहे असें वाटूं लागलें.

तथापि पुरुषाचें मन मोठें संशयखोर म्हणतात तेंच खरें. इंदूचें निष्कपट मन आणि तिचें सरळ निर्भीड वर्तन पाहून माझें मन दिङ्मूढ झालें आहे. तिला तुम्ही पत्रद्वारें विचारून खुलासा करून घ्यावा. मला कळवा किंवा जमल्यास आपण यावें.

आईचें वजन १५० होतें तें आतां १०० वर आलें आहे. आप्पांची प्रकृति वयोमानाप्रमाणें बरी आहे. मला कंत्राटामध्यें पैशांची चांगली

प्राप्ति होते. वेळ कसा जातो हें समजत नाहीं. पण हेंच माझ्या दुःखाचें कारण असेल! कंत्राटांमुळें बायकोशीं बोलणें चालणें होत नाहीं! ईश्वर वस्ताद खरा. पैसे देतो, पण अशी मेख मारून ठेवतो. बायको सुंदर देतो, पण...दिवाणखाने आणि खोल्या पुष्कळ देतो, पण याच खोल्या... इच्छा नसतांना मनांतलें विष अखेर बाहेर पडलेंच! केव्हां तरी ओकारी बाहेर पडणें अवश्यच होतें.

आपला मेहुणा व स्नेही,

**भाऊ काळे**

---

## [ १३ ] मर्यादातिक्रम

काळे यांचा वाडा,
नारायण पेठ, पुणें.
ता. २०-९-२१.

पतिचरणीं सरलेचा नमस्कार विशेष.

मी पत्र लिहिणार आहें तें लिहिण्यास आरंभ कसा करावा हेंच समजत नाहीं. म्हणून एकदम विषय-प्रवेश, प्रस्तावना न करतां, करत्यें. पांचसहा दिवसांपूर्वी मी दिवाणखान्याजवळच्या खोलींत इंदूवहिनी पेटी शिकतात तेथें कांहीं कामाकरितां गेलें असतां बिन्दुमाधव म्हसकरांना किंचित् अतिप्रसंग करतांना पाहिलें! मी लगेच खोलीबाहेर आलें आणि घामाघूम झालें. हें मी अद्यापि कोणापाशींहि बोललें नाहीं. माझी समजूत आहे, कीं बिन्दु-माधवांनीं इंदुवहिनींची इच्छा नसतां मर्यादातिक्रम केला. अशी समजूत कां आहे हें शब्दांनीं सांगतां येत नाहीं, पण बायकांना समजतें. इंदू-वहिनीशीं या संबंधीं बोलावेंसें वाटतें, पण त्यांच्या मनांत आधींच अढी, मी हा विषय काढल्याबरोबर त्या भलतेंच कांहीं बोलायच्या. गैरसमजामुळें माझें मन कलुषित होऊं नये म्हणून मी त्यांच्याशीं योग्य संधी पाहून बोलणारच आहें. बोलणें होईल तोंपर्यंत मला भाऊंशीं मन मोकळें करून बोलतां येत नाहीं, चोरट्यासारखें होतें.

आईची प्रकृति त्यांतल्या त्यांत बरी आहे. इतर सर्व त्यांतल्या त्यांत ठीकच आहे. आपले मित्र नारायणराव पाठक यांना एक चांगली मुलगी सांगून आली होती, पण इतिहाससंशोधन सोडून लग्नाची उपाधि लावून घेण्यास ते तयार नाहींत. मुलगी बाकी (आमच्या बायकी बुद्धीप्रमाणें तरी) चांगली होती आणि नारायणरावांनीं इतिहासजिज्ञासेचें एवढें स्तोम न माजवितां लग्न केलें असतें तर बरें झालें असतें, अशी माझी बायकी बुद्धि सांगते. ते भाऊकडे आले म्हणजे गुप्त राजे, शुंग राजे, आंध्रभृत्य इत्यादिकांच्या नाण्यांबद्दल आणि शिलालेखांबद्दल, तसेंच शिवाजीच्या जन्मतिथीबद्दल आणि बाळाजी विश्वनाथाच्या नाशिक येथें सांपडलेल्या पूर्वजांच्या नांवांबद्दल उत्साहानें कांहीं तरी माहिती सांगत असतात. मृतांबद्दलची ही माहिती चांगली आहे; पण जिवंत पत्नीशीं त्यांनीं संभाषण केलें तर तें अधिक आनंददायक होईल आणि त्यांची प्रकृति बिघडलेली दिसते ती चार घांस ताजे खाण्यास मिळाले तर सुधारेल. पण ध्येयवादी लोक आमच्या सारख्या व्यावहारिक बायकांचें कशाला ऐकतील? त्यांना पत्नीप्रेमापेक्षां देशप्रीति किंवा ज्ञानप्रीति अधिक वाटणार!

आपली एकनिष्ठ व्यावहारिक पत्नी,

**सरला**

ता. क.—इंदुवहिनीला लवकरच भेटत्यें आणि खुलासा करून घेऊन लगेच आपणांस पत्र लिहित्यें.

**सरला**

---

### [१४] देवा, गैरसमज कां उत्पन्न करतोस?

काळे यांचा वाडा,

नारायण पेठ, पुणें.

ता. २४–९–२१

पतिचरणीं नमस्कारपूर्वक विनंति विशेष. आज सर्व खुलासा झाला. मी म्हटल्याप्रमाणेंच होतें, म्हणजे इंदुवहिनींची इच्छा नसतां आणि त्या

गैरसावध असतां तो प्रकार झाला. प्रथम त्यानें पुष्कळ साखर पेरली आणि विवाहसंस्थेबद्दल भलताच आदर बाळगणें कसें पाप आहे, पत्नीनें घटस्फोट केल्यावर काय पाहिजे तें करावें, तोंपर्यंत भलतीच गोष्ट करणें हें सांकेतिक विवाहनीतीच्याच नव्हे तर नित्य व स्वभावसिद्ध नीतीच्या विरुद्ध आहे असें जेव्हां तिनें सांगितलें, तेव्हां त्यानें तो विषयच बदलला. हळू हळू त्यानें दुसऱ्या मजेदार गोष्टी सांगण्यास आरंभ केला आणि उद्दीपक पेटीवादन करून शून्यमनस्क स्थितींत ती बसली असतां तिला त्यानें एकदम जवळ ओढलें, आणि त्याच वेळेस मी तेथें गेल्यें.

मी पाहिलेली गोष्ट कोणाजवळहि बोलल्यें नाहीं, फक्त आपणांस पत्रांत लिहून कळविली आहे, दुसऱ्या कोणास कधींहि सांगणार नाहीं. मी तुझी पाठ राखणारी बहीण आहें, तुझी बेअब्रू ती माझी बेअब्रू, इत्यादि गोष्टी मी तिला सांगितल्यावर तिला बरें वाटलें. आणि आम्ही आतां मैत्रिणी झालों आहोंत.

पत्रांत ही हकीकत थोडक्यांत लिहिली आहे, पण हुंदके, आंवढे, अश्रुपात, पदरानें डोळे पुसणें, मांडींत डोकें खुपसणें, पाठ थोपटून पदरानें डोळे पुसणें, वगैरे गोष्टी कादंबरींत वर्णन करावयाच्या असतात. पत्रांत लिहून काय उपयोग ? कल्पनेनें आपणांस त्या जाणतां येतील. तो दिवस आणि तो अनुभव मी कधीं विसरणार नाहीं एवढेंच मी लिहित्यें. प्रथम आम्हांला कितीहि दुःख झालें असलें तरी या समान दुःखामुळेंच आमचीं मनें आतां निर्मळ झालीं आहेत. मी दुष्टपणा करून सगळ्या जगांत बोभाटा करीन अशी इंदुवहिनीला भीति होती ! आणि कोणाबद्दल ही भीति, तर माझ्याबद्दल ! देवा, असे गैरसमज उत्पन्न करण्यांत तुला काय भूषण वाटतें ? असो. शेवट फारच गोड झाला आहे. आतां यापुढें तरी कोणाच्या मनांत गैरसमज उत्पन्न होऊं नये.

घरांत भाऊ चमत्कारिक वागतो आहे, पण लवकरच त्याच्याशीं मनमोकळें करून बोलून ( पण मुद्याची गोष्ट माझ्याजवळच ठेवून )

त्याचें मन शुद्ध होईल असें करत्यें. आईची प्रकृति आहे तशीच आहे. अप्पा अलिकडे कोणाशींच फारसें बोलत नाहींत. तरी गोड बोलून नारायणराव पाठकांनीं त्यांचेजवळून घराण्यांतले अगदीं जुने कागद वाचण्याकरितां अखेर मिळविलेच. लग्नाचे बाबतींत त्यांनीं नकार निश्चितपणें दिल्याचें लिहिलें आहे काय ?

आपली पत्नी,

**सरला**

---

## [ १५ ] बायकांना उच्च आकांक्षा समजत नाहींत ?

साखरपें,

ता. २२–९–२१.

रा. रा. नारायणराव पाठक यांस कु. काशी ढवळे हिचे नमस्कार.

आपल्या आणाभाका झाल्या होत्या व आपणा उभयतांना तरी आपल्या लग्नाबद्दल संशयच नव्हता. योग्य काळीं जनरीतीप्रमाणें वडिलांकडून आपणांस पत्र गेलें. अनुकूल उत्तर उलट डांकेनें येईल अशी आशा करीत मनांत मांडे खात होतें. पण भ्रमाचा भोपळा फुटला ! माझें नशीबच फुटकें त्याला आपण काय करणार ? आपलें उडवा–उडवीचें आणि धरसोडीचें उत्तर वाचून काय वाटलें तें पत्रांत लिहितां येत नाहीं. शाकुंतल नाटकांतील पांचव्या अंकांत दुष्यंत राजानें “ शकुंतला ही माझी कोणी नाहीं. तिला मी लग्नाचें कधीं वचन दिलें नाहीं” असें जेव्हां म्हटलें, तेव्हां तिला काय वाटलें असेल याची मला आतां कल्पना येते. दुष्यंत पहिल्या अंकांत विदूषकाला म्हणाला कीं “ शकुंतलेविषयीं माझें मन आसक्त झालेलें आहे तें सगळें खोटें बरें का,–तें मीं उगाच कांहीं तरी थट्टेनें बोललों.” ( परिहासविजल्पितं सखे परमार्थेन न गृह्यतां वचः )

हेंच आपण मला उत्तर देणार काय ? आपलं सगळं बोलणं–चालणं, आपल्या आणाभाका, आपले पुढचे बेत, आपल्या आकांक्षा, हें सगळं “ परिहासविजल्पितम् ” होतं म्हणावयाचं !

आपणांला हा "परिहास" असेल; "आहे" असंच आतां म्हटलं पाहिजे. "आपला खेळ होतो, पण आमचा जीव जातो" असं गोष्टीं-तल्या बेडकांप्रमाणें म्हणण्याशिवाय दुसरं मी काय करणार ?

आपण इतरांप्रमाणें चंचल–चवचाल नाहीं आणि आपण लग्नाला "होय" म्हणण्यास कांकूं करतां तें आपल्या उत्कट ज्ञानलालसेच्या मी आड येईन या भीतीनें आपण म्हणत असाल अशी माझी कल्पना आहे. पण मी आपल्या ऐतिहासिक संशोधनाच्या आड येईन अशी कल्पना तरी मनांत कां यावी ? आम्हां बायकांना उच्च आकांक्षा समजत नाहींत ? का आम्हांला दारिद्र्यांत राहतां येत नाहीं ? कल्पना तरी काय आहे ?

आमच्याविषयीं आपली कल्पना कांहींहि असो, मी आपल्या सारख्या पुरुषांना आपण लग्न करण्याचें नाकारिलें तरीहि थोरच समजत्यें, किंबहुना, ध्येयाकरितां "नाहीं" म्हणूं शकतां म्हणूनच थोर समजत्यें. मघाशीं दुष्यंताची उपमा दिली ती क्षणिक रागाच्या भरांत दिली.

आपण योग्य तेंच करावें. मीहि योग्य तेंच करीन, म्हणजे आपण नाहीं म्हटल्यास जन्मभर अविवाहित राहीन.

आपली बालमैत्रीण,
**काशी ढवळे**

---

## [१६] "श्रेष्ठ धारिष्ट" ?

इतिहास–संशोधन मंदिर,–
सदाशिव पेठ, पुणें,
ता. २९–९–२१

मित्रवर्य विनायकराव भोळे, मुक्काम बारडोली, यांस नारायण पाठक, मुक्काम पुणें, याचा साष्टांग नमस्कार वि. वि.

मला काशी ढवळे ही मुलगी सांगून आली आहे. तिच्याशीं सुमुहूर्त पाहून मी लग्न करावें, द्रव्यसाहाय्य पाहिजे असल्यास (श्वशुरांकडून मागून

घेऊन) तें देण्यास तूं तयार आहेस, वगैरे गोष्टी तूं लिहितोस हें आनंद-दायक आहे. काशी ढवळे ही मुलगी खरोखरच चांगली आहे, मुहूर्तहि चांगला सांपडेल, ग्रह आडवे आल्यास त्यांची शांति करण्याचें सामर्थ्य 'भूयसी दक्षिणेंत' आहे, वधूचें प्रेम आहे आणि योजिलेल्या वराचेंहि निःसीम प्रेम आहे हें तुला ठाऊक आहेच; पण त्याची इच्छा नाहीं त्याला तूं काय आणि मी काय करणार? इतिहाससंशोधनाचें मला आतां वेडच लागलें आहे. वेड आहे हें मला ठाऊक आहे, पण तें आतां जायचें नाहीं. ध्येयवादी नादी लोक असेच मरावयाचे. देशाच्या नादीं लागून तूं संसाराची होळी करून घेत आहेस हें पाहूनच मी संसारांत पडत नाहीं! कलेचें वेड असेंच वाईट. आपल्या भाऊ काळ्याची बायको इन्दु हिचें उदाहरण आतां माझ्या डोळ्यांसमोर आहे. ती वाईट नाहीं याची मला दखलगिरी आहे, पण किती चांगली असली तरी बिन्दुमाधव कांहीं तरी दुष्टपणा करून अलम दुनियेंत तिचें बदनाम करील आणि मग तिला जिवापेक्षां अब्रु प्यारी असल्यामुळें ती केव्हांतरी आपला नाश करून घेईल अशी मला भीति वाटते. हें सर्व कशामुळें होणार आहे, तर कलेच्या प्रेमामुळें. जगांतलीं प्रेमं म्हणजे वेडं! शौक कसलाहि असो, तो केव्हां तरी शोककारक व्हावयाचाच! प्रेम हें अल्लाविषयीं असो किंवा इल्माविषयीं असो, परीविषयीं असो किंवा प्याऱ्या दोस्तासंबंधीं असो, तें मनुष्याला पागल बनवितें, असें एका उर्दू कवीचें अनुकरण करून मी म्हणतों. शेक्सपिअरनेंहि प्रेमी आणि पागल यांना एका माळेचे मणी म्हटलेलें आहे हें तुला ठाऊकच आहे. तात्पर्य, प्रेम म्हणजे पागलपणा. तें जितकें दिस-ण्यांत सुंदर तितकी त्याला कीड लागण्याची भीति अधिक. तें जितकें समाजाला उपयोगी तितकें व्यक्तीला मारक. सृष्टीचा आणि इतिहासाचा हा सिद्धान्त त्रिकालाबाधित आहे.

तुझ्या तिकडे कोणाजवळ ऐतिहासिक महत्वाचे कागद मिळणें शक्य आहे का? विचारून पहावें. पेशवाईत गायकवाड आणि पेशवे यांमध्यें

पुष्कळ कटकटी होत त्यामुळें मातबर मराठी सरदारांची तिकडे आमद-रफ्ती पुष्कळ होती. कळावें.

आपला मित्र,
**नारायण पाठक**

ता. क. हें पत्र लिहून झालें, पण डांकेंत टाकण्याचें कांहींतरी निमित्त होऊन राहून जात आहे. काशी ढवळे ही माझी बालमैत्रीण आहे व मी एकेकाळीं तिच्याशीं लग्न करण्यासंबंधीं वचनबद्ध होतों. आमच्या प्रेमाच्या गोष्टी तुला मी कितीदां तरी ऐकविल्या आहेत. पण दोन वर्षांपूर्वी ज्ञानप्राप्ति व ज्ञानसंवर्धन, विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासाचें संशोधन, हें मी आपल्या आयुष्याचें ध्येय ठरविलें हें तुला ठाऊक आहे. तरी देखील जणूं कांहीं कांहीं एक ठाऊक नाहीं अशा तऱ्हेचें तूं कां लिहितोस? मी वचन मोडलें हें वाईट असेल–आहे–हें मला समजतें. तिचें माझ्यावर उत्कट प्रेम आहे हें मी जाणतों. माझ्यावरच्या प्रेमापायीं तिचें कदाचित् प्राणोत्क्रमणहि होईल हेंहि मी कल्पनेनें कल्पूं शकतों. अशा स्थितींत तिला मारण्याचें पाप माझ्या माथीं येणार हें मी ओळखतों. पण कर्तव्यामध्यें श्रेष्ठ–कनिष्ठ असा भेद आहेच. आणि काशी शहाणी आहे. ती प्रेमाचें नियमन करून आपल्या जीविताला नवीन वळण लावील अशी मला उमेद आहे. आणि म्हणून मी प्रेमविषयक कर्तव्याचा त्याग करून ज्ञानविषयक कर्तव्य करण्याचें श्रेष्ठ धारिष्ट दाखविण्याचें योजिलें आहे.

पण प्रश्न असा पडतो कीं मी आपल्या मनाची फसवणूक तर करून घेत नाहीं ना? मी नादिष्ट आहें आणि एका नादीं लागलों म्हणजे दुसरे नाद विसरतों या स्वभावदोषामुळें तर मी काशीला तोंडघशीं पाडीत नाहीं?

नाहीं—ज्ञानप्राप्तीच्या नादामुळें काशीला मी विसरलों नाहीं. तिला विसरणें शक्यच नाहीं. मनाची कुत्तर-ओढ होते. पानपतच्या "भाऊगर्दी"त सांपडलेल्या मराठ्या मर्दाला पळ काढणें चांगलें किंवा नाहीं हें ठरविणें जसें कठीण पडलें असेल त्याप्रमाणेंच माझ्या मनाची स्थिति झाली आहे. नाना

फडनवीसाप्रमाणें पळून जाऊन पुढें डोक्याचा पराक्रम करूं, का काशी ढवळेरूपी पठाणाला शरण जाऊन धर्मान्तर करूं, (कारण कर्तव्यकर्म सोडणें हेंच हल्लींचें ' धर्मान्तर ' आहे ) हा माझ्यापुढें प्रश्न आहे. हा प्रश्न सुटत नाहीं म्हणून काय करूं असें मला झालें आहे. इतके दिवस पत्र टाकलें नाहीं आणि अजूनहि टाकीत नाहीं.

* * *

आज संध्याकाळीं राजवाडे, व वासुदेवशास्त्री खरे भेटले. त्यांना माझी अडचण सांगितली. त्यांनीं " लग्न करून घे " असें सांगितलें. पण त्यांच्या शब्दांचाच नव्हे तर सर्व आयुष्याच्या ध्येयाचा रात्रौ १२ वाजेपर्यंत विचार केला. अखेर एकदम स्फूर्ति होऊन निश्चय झाला, समाधान वाटलें. " लग्न करावयाचें नाहीं " हाच तो निश्चय. उद्यां सकाळीं उठल्याबरोबर पत्र डाकेनें टाकणार.

**नारायण पाठक**

---

## [ १७ ] मनांतील शल्य

पुणें,
ता. ३०–९–२१.

रा. रा. विनायकराव भोळे यांस इंदू काळे हिचा नमस्कार वि. वि.

मी इतके दिवस आपणांस कधींहि पत्र लिहिलें नाहीं, पण आज लिहीत आहें याचें कारण तसेंच महत्वाचें आहे. पत्रांतील भाषेकडे आणि शुद्धलेखनाकडे आपण चोखंदळपणानें पाहतां हें मला ठाऊक आहे, पण मला जसें येईल तसें मी लिहित्यें. चुका दाखविण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

पत्र लिहिण्याचं कारण असं, कीं माझ्याविषयीं हल्लीं घरींदारीं फार संशय उत्पन्न झाला आहे. ("दारीं"च असता तर मला त्याची पर्वा नव्हती, पण

" घरीं "हि आहे म्हणून पत्र लिहावें लागत आहे. ) संशय अगदीं निराधार नाहीं. बिंदुमाधव म्हसकर यांचा माझ्याशीं बराच परिचय झालेला आहे आणि ते मला पेटी आणि गाणें शिकवणीपुरतेंच नव्हे तर अधिक वेळ शिकवीत बसतात; इतकेंच नव्हे तर त्यांनीं एकदां किंचित् अतिप्रसंगहि केला हें आपणांजवळच मी कबूल करत्यें. ( सरला-वन्संकडून हें अगोदरच आपणाला कळलं असेल म्हणून तें लपविण्यांत अर्थहि नाहीं ! ) परंतु काय असेल तें असो, त्यांचें हृदय वाईट असेल असें मला वाटत नाहीं. भक्तिरसाचीं पदें त्यांनीं म्हटलेलीं ज्यांनीं ऐकलीं असतील त्यांना माझें म्हणणें पटेल. खऱ्या भक्तीचा ओलावा असल्याशिवाय अशा रीतीनें पदें म्हणतांच येणार नाहींत. फुप्फुस बिघडून दमा झालेल्या मनुष्याला जसं गातां येणार नाहीं, त्याप्रमाणेंच हृदयाला कीड लागून अनीतिमान् झालेल्या मनुष्याला गाण्यांत उत्तम भक्तिरस आळवितां येणार नाहीं. अलगुजाला किंवा "फ्ल्यूट"ला चीर गेली असली तर चांगले सूर त्यांतून कसे निघतील ? उत्तम गाण्याची देखील अशीच गोष्ट आहे,—हृदयांत बिघाड झाला असला तर दुसऱ्याच्या हृदयाचा ठाव घेणारे सूर त्यांतून निघणारच नाहींत. आतां एखादवेळेस मनुष्याला मोह होणार नाहीं असं नाहीं. पण ह्या त्याचा कायमचा स्वभाव आहे असं मानूं नये,–निदान असं माझं आपलं बायकी मत आहे. हृदयांत खऱ्या भक्तीचा ओलावा असल्याशिवाय अशा रीतीनें पदें म्हणतांच येणार नाहींत. आतां देहधर्मानुसार मनुष्य एखादवेळेस घसरतोच आहे. ही गोष्ट निराळी. माझी ही अशी दृष्टि आहे, पण लोकांना भलताच संशय येतो. मी म्हणतें बिंदुमाधव वाईट असतील– " आहेत " असें आपण घटकाभर धरूं या–पण त्यांच्याजवळ गाणं आणि पेटी शिकण्याला काय हरकत आहे ? आपलं मन खंबीर असलं म्हणजे झालं. मला त्यांच्यापासून कला शिकावयाची आहे आणि माझी कलेची तहान भागवून घेतांना मी इतर गोष्टींकडे कशाला पाहूं ? अगदीं खरं बोलावयाचं म्हणजे मला त्यांचं गाणं-बजावणंच आवडतं असं नाहीं तर त्यांच्या बरोबर बोलणं–चालणंहि आवडतं. पण त्यांत कांहीं पाप आहे असें मला

वाटत नाहीं. मला हरतऱ्हेच्या कलाकौशल्याची आणि सुंदरतेची आवड आहे ती लोकापवादासाठीं मला दाबतां येत नाहीं. ती दाबून चिरडून टाकणें आपणांला इष्ट वाटत असल्यास कळवावें. आपलें मत मला फार विचारार्ह वाटतें म्हणून लिहीत आहें. बायकांना स्वतःच्या कांहीं आवडी-निवडी नसाव्यात काय ? कलेच्या प्रेमाकरितां त्यांनीं कलाकुशल लोकांशीं परिचय केला तर तो वाईट काय ? कलावन्त हा नेहमीं वाईटच असतो काय ? आणि तो वाईट असला म्हणून त्याच्या कलेलाहि त्याच्या वाईटपणाचा विटाळ होतो काय ? हा विटाळ त्याच्याशीं कला शिकणाऱ्यांनाहि बाधक होतो काय ?

'त्यांना' माझ्या सगळ्या हौशी पुरवाव्याशा वाटतात, पण बिंदुमाधवांचा संशय येतो. ते कांहीं स्पष्ट बोलत नाहींत, पण लोकापवाद त्यांच्या कानांवर वारंवार आदळून त्यांना चैन पडूं देत नसावेत. त्यांच्या मनांत कांहीं तरी मला स्पष्टपणें सांगावेंसें वाटत असावें, पण सांगवत नाहीं. माझीहि अशीच अवस्था झाली आहे. बिंदुमाधवांचा अतिप्रसंग मी सरलावन्संना सांगितला, ( आपणांलाहि आतां या पत्रांत कळविला ); पण त्यांना प्रांजलपणें सांगवत नाहीं. भीति वाटते. भीति कसली ती सांगतां येत नाहीं. शिकवणी बंद करतील ही भीति आहेच. पण खरी भीति भलत्या संशयाची. मी गुन्ह्यांत साथीदार आहें आणि आपला गुन्हा लपविण्याकरितां साथीदारावर उलटत आहें असा कदाचित् संशय यावयाचा. म्हणून कांहींच बोलूं नये असं वाटतं. पुरुषांचं मन कोणी सांगावं ? आणि त्यांचं मन कलुषित झालं तर माझ्या जन्माचं मातेरं होईल. मला टाकतील हें कांहींच नाहीं,—खरं दुःख याचं कीं त्यांच्या सारख्यांना मी दुःख दिलं आणि त्यांच्या सारख्यांचं प्रेम मी गमावलं.

आपणाला सगळ्या गोष्टी दिग्दर्शित केल्या आहेत ( विस्तारानें लिहूं लागल्यावर एक कादंबरीच होईल ! ); तरी आपण योग्य तो उपदेश मला करावा आणि वाटल्यास त्यांनाहि करावा. त्यांचं मन अलीकडे माझ्याशीं खुलं नाहीं, हें माझ्या हृदयांतील शल्य आहे. तें कसंहि करून दूर करावं.

सरला–वन्संची प्रकृति ठीक आहे. त्या आपणाला लवकरच छोटासा अहेर करतील असें वाटतें. पण त्या अहेराचें कौतुक करण्यास आपण इकडे यावें; पण सरकार येऊं देतें का आपणांस तुरुंगांत डांबून ठेवतें हा प्रश्नच आहे. इतके दिवस सगळ्यांचे आनंदांत गेले, पण आतां सगळ्यांनाच आप-आपल्या परीनें काळज्या उत्पन्न झाल्या आहेत. ईश्वराची मर्जी.

इन्दू काळे

---

## [ १८ ] धर्माभिमानी ?

कसबा पेठ, पुणें,
ता. ९–१०–२१

रा. रा. विनायकराव भोळे, मुक्काम बारडोली यांस सा. न. वि. वि.

आपले हितचिंतक म्हणून हें पत्र लिहीत आहों. आपले मित्र नारायणराव पाठक यांचा सौ. इंदुबाई काळे यांच्याशीं फार परिचय होत चालला आहे तो लोकांना पाहवत नाहीं. आपणाला पाहवत असल्यास कोण काय करणार ? सुधारकांना काय वाटेल तें वाटो, आम्हां सनातनी हिंदु लोकांना तरी असला अतिपरिचय आवडत नाहीं. विंदुमाधव म्हस्करांचेबद्दल नारायणराव गांवामध्यें खोट्या कंड्या उठवीत आहेत. पण हें सर्व आपलें कृष्णकृत्य झांकण्याकरितां आहे. भाऊराव काळे यांना आम्ही पत्र लिहिलेंच आहे. आपण त्यांचे नातलग व स्नेही म्हणून आपणांसहि लिहीत आहों.

सही करणें कायद्याच्या दृष्टीनें धोक्याचें आहे म्हणून आम्हीं कसबा पेठवासी सनातन धर्माभिमानी लोक सही करीत नाहीं.

आपले
**धर्माभिमानी हितेच्छु**

---

## [ १९ ] मनांतील किल्मिषें कशीं निघून जातील

बारडोली.

ता. १०-१०-२१.

सौ. इंदुबाई काळे यांस विनायकराव भोळे याचा नमस्कार वि. वि.

तुमचें पहिलेंच पण विलक्षण पत्र मिळालें. तुम्ही प्रांजळपणें आणि माझ्यावर पूर्णपणें विश्वास ठेवून अत्यंत स्नेहभावानें पत्र लिहिलेंत हें पाहून आनंद झाला. पण मजकुरानें मात्र मनाची चलबिचल झाली.

भाषाशुद्धीकडे आणि शुद्धलेखनाकडे माझी जी नजर असते तिची आपल्या कुटुंबांत चेष्टा उडविण्यांत येते हें मला ठाऊक आहे. पण गाणें ऐकतांना बदसूर आले म्हणजे जसें तुम्हांला होत असेल तसेंच मला अशुद्ध लेखन पाहिल्यानें होतें. पण हा अगदीं गौण प्रश्न आहे.

तुमच्या पत्रांतील महत्वाच्या भागासंबंधीं काय लिहावें हें निश्चित ठरविणें कठीण आहे, म्हणून जे विचार जसे सुचतील तें तसे लिहितों.

( १ ) भाऊरावांच्या कानांवर सर्व प्रकारचे लोकापवाद गेले आहेत व ते " मित्र " मंडळीच्या कुचेष्टांचा विषय झाले आहेत, तरी सुद्धां ते तुम्हांला एका शब्दानें दुखवीत नाहींत किंवा स्वातंत्र्याच्या आड येत नाहींत यांत त्यांचा जो मनाचा थोरपणा आहे तो कधींहि विसरूं नये.

( २ ) दुसरी गोष्ट अशी कीं कलेची आवड ठीक आहे, पण कलेपायीं नीति नावडती होणें चांगलें नाहीं. गाण्यामध्यें ताना आणि आलाप यांचे बाबतींत गाणाऱ्याला थोडेंबहुत स्वातंत्र्य असलें तरी त्यानें " ताल " केव्हांहि संभाळलाच पाहिजे, त्याप्रमाणेंच कलेकरितां थोडेंबहुत स्वातंत्र्य इष्ट आहे, पण नीतीचें " ताल-तंत्र " संभाळलेंच पाहिजे. कलेची तहान भागविण्याकरितां नीतीच्या रक्ताचा घोंट घेणें बरोबर नाहीं. भाऊरावांशीं विवाहबद्ध झालांत तेव्हां तुम्हीं कांहीं बंधनें आपण होऊन स्वीकारलींत. तीं मोडणें चांगलें नव्हे. हें मी गूढ अध्यात्माचा आधार

घेऊन म्हणत नाहीं तर ही साधीसुधी नीति आहे. दुसऱ्याला आपल्यामुळें दुःख होऊं नये अशी कोणत्याहि विचारी माणसाची इच्छा असते. पतीला आपल्यामुळें दुःख होऊं नये हें पत्नीला तर वाटणें साहाजिकच आहे. अर्थात् दुःख न होईल असें वागणें हें तिचें कर्तव्य होतें. "सहधर्मचारिणी" या नात्यानें तिनें जीं कर्तव्यें अंगावर घेतलेलीं असतात तीं हरतऱ्हेच्या सुखोपभोगाच्या व विलासांच्या आड येतील, कलाविषयक हौशी-आवडींना त्यामुळें पायबंद बसेल, देशाभिमानाच्या व इतर कर्तव्यांशीं त्यांचा लढाहि होईल; पण तीं झुगारून देणें सामान्यतः इष्ट नाहीं.

आतां तुम्हीं म्हणाल कीं "बिन्दुमाधव म्हस्करांशीं गाणेंबजावणें शिकण्यांत वाईट काय आहे?" वाईट कांहीं नाहीं, पण बिन्दुमाधव हे मनुष्य आहेत आणि तुम्हीहि मनुष्यच आहांत. अतिपरिचय झाला असतां कोणाला केव्हां मोह होईल याचा नेम नाहीं, म्हणून मोहकारणच दूर सारावें. हें तुम्हांला इष्ट वाटत नसल्यास भाऊरावांशीं प्रांजळपणें सर्व गोष्टी बोलाव्यात आणि त्यांची संमति घेऊन शिकवणी चालू ठेवावी. मन मोकळें करून ("सर्व" नाहींत तरी बहुतेक सर्व) गोष्टी बोलल्यास ते आपल्या कलेची हौस पुरवतील आणि लोकांत उठलेल्या कंड्यांना भीक घालणार नाहींत. त्यांचें तुम्हांवर किती प्रेम आहे याची तुम्हांला कल्पना नाहीं; मला आहे. त्यांना कलेची हौस नाहीं असें नाहीं, पण तुमच्यासारखी उत्कट नाहीं एवढेंच. तुमच्या यौवनानें आणि सौंदर्यानें त्यांचें प्रथम लक्ष वेधलें, मग तुमची कलाभक्ति व कलानिपुणता पाहून त्यांचें तुमच्यावर प्रेम बसलें, व तुमचा प्रांजलपणा आणि स्वतःच्या मतांबद्दलचा आग्रह यांनीं तर त्यांचें मन काबीजच केलें, असा त्यांच्या प्रेमाचा थोडक्यांत इतिहास आहे हें त्यांचीं बरींचशीं गुपितें जाणणारा मी तुम्हांला सांगतों. या गोष्टी सांगण्याचें कारण एवढेंच कीं तुम्ही भाऊरावांशीं सरळपणें आणि कांहीं एक आडपडदा न ठेवतां बोलावें. असें बोलणें झाल्यास उभयतांच्या मनांतील सगळीं किल्मिषें निघून जातील.

आपण सगळे एकत्र जमून बोललों–चाललों असतों तर सगळ्या गोष्टी ठीक जमल्या असत्या. पण मला तिकडे येणें शक्य नाहीं. घरजांवई म्हणून तुमच्या घरांतला पाहुणचार सोडून लवकरच मी चतुर्भुज होत्साता सरकारचा जांवई होणार आहें आणि तुरुंगांतला गोड पाहुणचार घेणार आहें! गोष्टी थट्टेवारी नेऊन आगामी घोर प्रसंगाचा कठोरपणा कमी करण्याचा मी प्रयत्न करीत आहें; पण तो कसा साधणार? तथापि गोष्टी थट्टेवारी नेण्याचा प्रयत्न करावयाचा नाहीं, तर मग काय रडकथा सांगूं? माझ्याविषयीं काळजी करूं नये. तीन वर्षांनीं का सहा वर्षांनीं सुटून आल्यावर पुनः आपले सगळ्यांचे दिवस आनंदांत जातील अशी मला आशा आहे. त्या दिवसाची मी तुरुंगांत वाट पहात राहीन.

सौभाग्यवतीसंबंधानें काय लिहूं? कांहीं लिहीत नाहीं झालं. उभयतांस आशीर्वाद.

**विनायकराव भोळे**

---

## [२०] तुरुंगांत पाऊल टाकण्यापूर्वी

बारडोली,
ता. १५–१०–२१.

प्रिय मित्र भाऊ काळे व प्रियपत्नी सरला–यांस विनंति विशेष.

सत्याग्रह करून तुरुंगांत जाण्यापूर्वी हरतऱ्हेचे विचार येत आहेत त्यांबद्दल उभयतांना पत्र लिहीत आहें.

गुजराथी लोकांचा माझा अनुभव त्यांचे विषयीं अनुकूल ग्रह उत्पन्न करणारा आहे. त्यांच्यामध्यें दिखाऊ स्नेह आणि आदरसत्कार आपल्यापेक्षां अधिक आहे (या बाह्य आदरसत्काराला व स्नेहाला ते "विवेक" म्हणतात) पण एकंदरींत जात्या ते प्रेमळ आहेत. मी आजारी असतांना एका कुटुंबानें माझी जी सेवा केली तिचें कौतुक करावें तेवढें थोडें.

एकदां मला विलक्षण अनुभव आला. मी संध्याकाळीं सायकलवर बसून फिरत फिरत लांब गेलों होतों. परत आपल्या गांवीं येतांना रात्र झाली आणि मलाहि थोडीशी भीति वाटूं लागली. पण दरिद्यांना आणि त्यांत पुरुषांना भीति वाटण्याचें स्तोम माजविण्याचें कारण नसतें, आणि माजवून चालतहि नाहीं, अशा प्रकारचे विचार मनांत येत आहेत, तोंच एक ( पठाण नाहीं ! तर ) गरीब मजुराची मध्यम वयाची एक सुंदर स्त्री दिसली. ती गुजराथीमध्यें म्हणाली, " दादा, मला सोबत करतां का ? सायकल सावकाश चालवा, मी आपल्याबरोबर धांवत येत्यें. मी बाई माणूस आहें, मला भीति वाटत आहे. " माझ्याबद्दल तिला इतका विश्वास वाटला हें पाहून मी आनंदलों आणि सायकलवरून उतरून तिच्या बरोबर चालूं लागलों. वाटेंत कांहीं तरी बोलणें काढलें पाहिजे म्हणून तूं कोण कोणाची वगैरे विचारलें, तेव्हां तिचा नवरा गवंडी असून त्याला दारूचें व्यसन आहे, उशीर झाला तर तो रागावेल आणि मारील असें तिच्याकडून समजलें. ती स्वतः मजुरी करून चार आठ आणे मिळविते; खेड्यांत राहणाऱ्या तिच्या भावानें आज तिला बोलावलें होतें म्हणून त्याच्या गांवीं ती गेली होती. तेथून निघतां निघतां उशीर झाला. नवऱ्याला घरीं आल्यावर त्याला खायला कोण देईल ही प्रेममूलक एक काळजी आणि रागावला तर किती आणि कसा मारील ही भीतिजन्य दुसरी काळजी ! नवरा दारूबाज होता तरी त्याच्याबद्दलचें तिचें प्रेम अवर्णनीय होतें. तें पाहून मला तिच्याबद्दल अतिशय आदर वाटूं लागला. अशिक्षित आणि गरीब असली म्हणून काय झालं, ती खरोखर साध्वी होती. आणि या साध्वीनें माझ्यावर पूर्ण विश्वास टाकून मला सोबतीला रहा म्हणून सांगितलें यांत मला बहुमान वाटला. माझ्यावर तिनें इतका विश्वास ठेवावा इतकें तिला काय दिसलें कोणास ठाऊक !

आतां दुसरी एक गोष्ट सुचली आहे ती लिहितों. गीतारहस्याचें वाचन करीत असतां मला गीतेंतील पाठांबद्दल कांहीं कल्पना सुचल्या. पण बारडोलीच्या धांदलींत वेळ कोणाला आहे आणि पुस्तकें कोठून मिळणार ?

आतां तिसरी गोष्ट लिहितों. (क्रम किंवा संगति पाहूं नये. घाईंत लिहीत आहें.) माझा हिशेब तपासून पाहण्यास बापूजींकडून (म्हणजे अर्थात् गांधींकडून) एक मनुष्य आला. त्यानें २॥ आण्यांचें एक व्हाऊचर नाहीं अशी माझ्या हिशेबांत चूक काढली आणि भलतेंसलतें तो बोलूं लागला. व्हाऊचर नसणें ही चूक आहे, आणि अडीच आणे मी भरणेंहि प्राप्त होतें, पण माझी पूर्वपरंपरा, माझें अलीकडील वर्तन, चळवळींत पडण्यांतील माझे हेतु, माझा दर्जा, वगैरे पाहून तरी त्या गृहस्थानें भलतें-सलतें बोलावयास नको होतें. सार्वजनिक फंडाबाबत चोख असणें आवश्यक आहे ही गोष्ट खरी असली तरी सारासार विचार अगदींच सोडावा काय? कदाचित् तो गृहस्थ आपलें कर्तव्य करीत असेल आणि मी त्याला उगीच दोष देत असेन. आपण चूक करून दुसऱ्याला नांवें ठेवण्यांत अर्थ काय? एवढें मात्र मनांत येतें, कीं देशप्रेमामुळें द्रव्यहानि झालीच, संसारसुख संपलें, ज्ञान-लालसा पोटांतच जिरली आणि आतां यःकश्चित् चुकीमुळें नांवहि बद्दू होण्याची वेळ आली आहे!

याला दुसरें एक कारण असूं शकेल. मला एका डिटेक्टिव ऑफिसरानें एकीकडे नेऊन महिना ५०० रुपये देववितों, गांधींच्या राज-कारणांतल्या बातम्या देत जा, असें मला म्हटलें. मी अर्थातच नाहीं म्हटलें. तथापि डिटेक्टिव ऑफिसराजवळ एकीकडे बोलणें झालेलें कांहींनीं पाहिल्यामुळें मी डिटेक्टिव असावा असा संशय पसरला आहे आणि म्हणून या संशयाला बळी पडल्यामुळेंच २॥ आण्याच्या चुकीबद्दल त्या ऑडिटर गृहस्थानें माझी कठोर शब्दांनीं हजेरी घेतली असावी! जगांत गैरसमज असें नुकसान करीत असतो!

* * *

—भाऊ, तुरुंगांत जाण्यापूर्वी तुला आतां एक गोष्ट सांगतों. थोड-क्यांत सांगतों, पण लाख रुपयांची आहे. इंदूला व्यवहार समजत नाहीं, तिला कलेचें भलतेंच वेड आहे, पण ती शुद्ध व निर्मळ आहे.

माझ्यावर विश्वास ठेव आणि सगळे किंतू, सगळे संशय, सगळीं शल्यें हृदयांतून बाहेर काढून टाक.

* * *

—सरले, तुला काय लिहावयाचें? व्यवहार न समजणारा आणि ध्येयाचें वेड लागलेला तुझा पति तुला आणि स्वतःला दुःखांत लोटीत आहे. सुखानें का तो ही गोष्ट करीत असेल? नाहीं. मला माझें ध्येय तुरुंगाकडे लोटीत नेत आहे. गीतेंत म्हटल्याप्रमाणें "बलादिव नियोजितः" अशी माझी स्थिति आहे. क्षमा कर वगैरे कांहीं लिहीत नाहीं. तूं माझ्यापेक्षां विद्येंत कमी असलीस तरी कर्तव्यअकर्तव्य जाणण्यांत अधिक समंजस आहेस अशी माझी मनोदेवता सांगते.

तुझ्याविषयींहि भलत्या कंड्या उठत आहेत असें निनावी पत्रांवरून समजलें. पण या कंड्यांची योग्यता न समजण्याइतका मी "भोळा" नाहीं.

**विनायक भोळे**

---

### [ २१ ] खूप पैसा मिळतो, पण—

काळे यांचा वाडा,
नारायण पेठ, पुणें,
१–१–२२.

मित्रवर्य विनायकराव भोळे यांस भाऊ काळे याचे सा. न. वि. वि.

आपणांस १॥ वर्षांची शिक्षा झाली हें तारेनें कळलें. जिवावरचें शेपटीवरतींच गेलें म्हणावयाचें! १० वर्षांची सजा दिली असती तर त्यांचें आपण काय केलें असतें?

सरलेला अर्थात् दुःख झालें आहे, पण तिनें हाय खाल्लेली नाहीं. ती इतकी धीराची असेल असें वाटलें नव्हतें. आईची व अप्पांची

अवस्था मात्र दिवसेंदिवस शोचनीय होत चालली आहे. जांवयाला झालेल्या शिक्षेमुळें ( आणि सुनेबद्दलच्या बऱ्यावाईट कंड्यांमुळें ) दोघेंहि म्लान झालेलीं आहेत. पण करावयाचें काय ?

वर कंड्यांचा उल्लेख केला तो कदाचित् करावयास नको होता. पण एका अर्थी केला हेंच बरें झालें. मी बिन्दुमाधव म्हस्करांबद्दल भलताच संशय घेत नाहीं, कारण तो जरी मला संशयास्पद दिसत असला तरी इन्दू-बद्दल माझी खात्री असल्यामुळें त्याच्या शीलाविषयीं विशेष विचार करण्याचें कारण नाहीं.

प्रयत्नपूर्वक उदार बुद्धि ठेवून वर हें लिहिलें खरें, पण पोटांत काय होत आहे तें तुला समजण्यासारखें आहे.

सरलेला याच्यांतच पत्र लिहिण्यास सांगितलें होतें, पण ती आळस करीत आहे. तिला कांहीं दिवस गेले आहेत, हें मागें एकदां कळविलेंच होतें. बाळंतीण झाल्यावर खुशालीचें पत्र पाठवीनच. काळजी करूं नये. तिची प्रकृति चांगली आहे.

माझें कंत्राटाचें बस्तान चांगलें बसत चाललें आहे. नोकरी धरली नाहीं हेंच बरें झालें. स्वतंत्र राहून पैसे मिळत आहेत. पण,—पण ही स्वतं-त्रता दिखाऊ आहे. मला नेहमीं घराबाहेर जावें लागतें. बायकोशीं चार गोष्टी बोलाव्यात, तिला कोठें घेऊन जावें, तिच्या हौशी पुरवाव्यात, गायनादि कलांकडे लक्ष द्यावें हें मला साधत नाहीं. इंदु पुष्कळ सुंदर वस्तु विकत घेत्ये, पुष्कळ प्रकारचीं लुगडीं-पातळें नेसते, टेबलावर सुंदर सुंदर मांडणी करत्ये, पण तिची वाहवा करावी किंवा निदान तें तें सौंदर्य ध्यानांत आलें आहे एवढें तरी दाखवावें, अशा गोष्टी माझ्या रुक्ष, साध्यासुध्या, व्यावहारिक माणसाला न साधल्यामुळें जें व्हावयाचें तें होतें. माझे दोष मी जाणतों, ते सुधारण्याचा प्रयत्न करतों, पण हे प्रयत्न कृत्रिम दिसतात ( आणि असतातहि ! )

नारायणराव पाठकांच्याविषयीं एक गोष्ट सांगावयाची आहे. त्यांनीं काशी ढवळे हिच्याशीं लग्न करण्याचें नाकारिलें हें तुम्हांला मागेंच लिहिलें. त्याच्या नंतर त्यांचें मन फिरलें होतें. योजिलेल्या वधूनें "आपण माझ्याशीं लग्न न केल्यास मी आजन्म अविवाहित राहीन" अशा अर्थाचें पत्र लिहिलें होतें तें त्यानें मला दाखवलें आणि मन हेलकावे खात आहे असें तो म्हणाला. इतिहासकार राजवाड्यांनींहि तूं लग्न करून घे, माझ्या नादीं लागूं नकोस, असें त्यांना पत्र लिहिलें म्हणतात. पण काय झालें कोणास ठाऊक, नारायणरावांनीं मुलीला पत्र लिहून कळविलें कीं "माझा इलाज नाहीं. मराठ्यांच्या इतिहासाचें कार्य मला तुझ्या प्रेमापेक्षां किंवा तुझ्या जीवितापेक्षां अधिक मौल्यवान वाटतें." ध्येयनिष्ठ माणसांचें सगळेंच निराळें!

तीन तीन महिन्यांनीं कैद्यांना पत्र लिहिण्याची परवानगी असते. तरी परवानगी मिळाल्याबरोबर सविस्तर पत्र लिहावें. मी स्वतः फारशीं पत्रें लिहीत नाहीं, लिहिलीं तर सविस्तर लिहीत नाहीं, पण लोकांनीं मला सविस्तर पत्रें लिहावींत असें मला वाटतें आणि तीं वाचण्यांत मला आनंद होतो, ही माझी खोड तुला ठाऊकच आहे.

आपला मित्र व मेहुणा,

**भाऊ काळे**

---

## [ २२ ] सगळे खुशाल !

साबरमती जेल,

२१-११-२२.

मित्रवर्य भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

मला जेलमधील कांहीं किरकोळ शिक्षा झाल्यामुळें पत्र लिहिण्याचा माझा हक्क मी इतके दिवस गमावला होता. गेल्या तीन महिन्यांत जेलचा नियम माझेकडून मोडला गेला नाहीं, म्हणून आतां परवानगी मिळाली आहे. पण कांहीं लिहावेंसें वाटत नाहीं.

अप्पांची व घरांतल्या सर्व माणसांची प्रकृति कशी आहे तें कळवावें. बाकी इन्दु, सरला व छोटू आणि इतर सर्व मंडळी खुशाल असतीलच; कारण मला वाईट वाटूं नये म्हणून तीं खुशाल आहेत असेंच आपण नेहमीं लिहिणार हें मी जाणून आहें ! मी खुशाल आहें हें मात्र मी खरें लिहिलें आहे. मी सुटण्याच्या सुमारास जेलमध्यें कपडे पाठवावेत व कोठें येऊं तें कळवावें. खुशालीचेंहि त्या वेळीं सविस्तर पत्र लिहावें.

आपला

**विनायक भोळे**

---

## [२३] पुढचे बेत

सत्याग्रहाश्रम, साबरमती.

ता. ३–६–२३.

प्रियपत्नी सरला हीस अनेक आशिर्वाद विशेष.

मी काल साबरमती जेलमधून सुटलों. छोटू आजारी होता म्हणून मागील पत्रांत लिहिलें होतेंस. तो आतां कसा आहे ? तूं अहमदाबादेस येशील असें वाटलें होतें. पण परवां जेलरनें भाऊचें पत्र दिलें त्यावरून तूंहि आजारी आहेस असें कळलें.

परवां तेथील युरोपियन जेलरनें मला ऑफिसांत बोलावून घेतलें तेव्हां मी मोठ्या आनंदानें तेथें गेलों. मला वाटलें कीं कपडे वगैरे तुमच्याकडून आले असतील तें सांगण्याकरितां त्यानें बोलावलें असावें. पण त्याच्या ऑफिसांत गेल्यावर त्यानें भाऊचें पत्र हातांत दिलें व वाचण्यास सांगितलें. कोणत्या आशेनें मी पत्र वाचण्यास घेतलें होतें आणि झालें काय ? पत्र वाचतां वाचतां माझ्या डोळ्यांत अश्रू आले आणि मी रडूं लागलों. तेव्हां जेलरनें खांद्यावर थोपटल्यासारखें करून दयार्द्र बुद्धीनें एका कोपऱ्यांतल्या खुर्चीवर बसण्यास मला सांगितलें ! माझ्या-

बद्दलच्या शोकामुळें तुझ्या आईचें दुखणें विकोपास गेलें! जेलमध्यें मी आनंदांत आहें हें पत्रांत लिहीत होतों, पण हें सगळें खोटें आहे असें तिला वाटत असलें पाहिजे; जांवयाबद्दलच्या शोकामुळें (आणि सुनेबद्दलच्या लोकापवादामुळें) बिचारी अकालीं मरण पावली. पण कदाचित् आपल्या-पुढें जीं दुःखें वाढून ठेवलेलीं दिसतात तीं पहावीं लागूं नयेत म्हणून ईश्वरानें तिची सोडवणूक केली असेल!

जेलमध्यें मला खरोखरच विशेष त्रास झाला नाहीं. अहमदाबाद येथील कांहीं मित्रांनीं वशिला लावून म्हणा किंवा पैसे भरून म्हणा मला एक दिवस मेवामिठाई पाठविली. ती मी खाल्ली, पण खातांना असा विचार आला, कीं हें धोक्याचें आहे. कोणी पकडलें तर स्वतःलाच नव्हे तर बाहेरच्या मित्रांना शिक्षा होईल. खाऊन झाल्यावर मिठाई घेऊन येणाऱ्या मित्राला निक्षून सांगितलें, कीं पुनः असें कांहीं करूं नये. आपण आणल्यास किंवा पाठविल्यास मी कशाला बोटहि लावणार नाहीं.

निक्षून सांगण्याचें दुसरें एक कारण झालें होतें. तें असें कीं नारायणराव पाठकांकडून याच मित्रमंडळीच्या मार्फतीनें मला एक थोडेंसें महत्वाचें पत्र चोरून पाठविण्यांत आलें होतें. पत्र वाचून आनंद झाला. पण तें लपवावें कसें हा प्रश्न पडला. लपविण्यापेक्षां फाडून टाकलेलें बरें असा विचार करून त्याचे बारीक बारीक तुकडे करून गजाबाहेर टाकले. पण चोरटें मन भित्रें असतें. मनांत अशी भीति उत्पन्न झाली, कीं हे कपटे जर कोणाच्या नजरेस पडले आणि त्यानें ते मेहनत घेऊन जुळवले तर मला आणि माझ्याबरोबर माझ्या मित्रांना चांगलीच शिक्षा होईल. तेव्हां चोरून पत्र आणण्याचें किंवा लिहिण्याचें काम आपल्यासारख्या बावळटांना जमावयाचें नाहीं असें मनाशीं ठरविलें आणि असल्या फंदांत पडावयाचें नाहीं असा कानाला खडा लावून घेतला.

जेलमधील बारीक सारीक मनोरंजक अनुभव भेटीअन्तीं सांगेनच. तेथील स्वच्छता आणि शिस्त हीं वाखाणण्यासारखीं आहेत. हिन्दी जेलरपेक्षां

युरोपिअन अधिक सरळ असतो असा माझा अनुभव आहे. तो प्रांजलपणें कबूल केला पाहिजे.

जेलमधून ज्या दिवशीं मला सोडलें त्या दिवशीं वास्तविक ८–९ ला जेलच्या बाहेर पडावयाचा, पण पदोपदीं त्रास देणारें माझें दैव माझ्या आड आलें आणि सुटण्याला बारा वाजले! माझें स्वागत करण्याकरितां आलेल्या थोर थोर मंडळींना बाहेर उन्हांत तिष्ठत बसावें लागलें म्हणून अतिशय वाईट वाटलें.

इन्दूचें आणि भाऊचें आतां चांगलें सूत जमलें आहे असें तुझ्या पत्रावरून दिसतें. पण बिन्दुमाधव म्हसकरांची शिकवणी बंद करणें इन्दु अद्यापि कां चालढकलीवर नेत आहे याचा उलगडा होत नाहीं.

बापूजींना ( मला ‘ महात्मा गांधी ’ हे शब्द आतां परकीपणा दाखविणारे वाटतात. ) मी भेटलों तेव्हांचा प्रेममय व कारुण्यपूर्ण प्रसंग वर्णन करीत नाहीं. आवेग ओसरल्यावर घटकाभर इकडचें तिकडचें बोलणें झालें. जाण्यापूर्वी ते म्हणाले कीं “ आतां तुम्ही महाराष्ट्रांत कोठें तरी खेड्यांत जाऊन खेड्याची सुधारणा करण्याचें काम हातीं घ्यावें अशी माझी इच्छा आहे. ” मीहि तुरुंगांत विचार करून मनाशीं हेंच ठरविलें आहे असें त्यांना सांगितलें. त्यावेळीं बापूजींना भेटण्यास दुसरी मंडळी आल्यामुळें बोलणें तेथेंच राहिलें. पण आतां पुण्यपत्तनस्थ सरलाबाईंना आणि छोटूरावांना एखाद्या खेड्यांत रहावें लागणार असा रंग दिसत आहे एवढेंच सध्यां लिहितों.

बी. ई. झाल्यावर नोकरी न धरतां भाऊनें स्वतंत्र धंदा करण्याचें ठरविलें हें चांगलें केलें. त्यांना कंत्राटांत किफायत पुष्कळ होते, पण बिचाऱ्याला सुख कोठें आहे? मला भेटण्यास येणार होता, पण आयत्या वेळेस महत्वाचें काम निघालें म्हणून येऊं शकला नाहीं, ही लहानशी गोष्ट सोडली तरी आई वारली, बायकोबद्दल लोकापवाद, बहिणीला ( मेव्हण्याच्या मूर्खपणामुळें ) हाल अपेष्टा सोसाव्या लागणार आहेत अशी भीति, वडील

आजारी आणि दुःखी कष्टी—अशा स्थितींत कंत्राटांतली किफायत किती सुख देत असेल तें दिसतेंच आहे.

नारायणराव पाठक हे डच रेकर्डसमध्यें मराठ्यांच्या इतिहासाची कांहीं माहिती मिळेल म्हणून मुंबईस जाऊन डच भाषा शिकले हें मागें ऐकलें. आतां गोवें येथें जाऊन तेथील रेकर्डसमध्यें कांहीं ऐतिहासिक माहिती असेल ती वाचतां यावी म्हणून पोर्तुगीज भाषा शिकत आहेत असें ऐकतों. लवकरच बेल्जिअन आणि स्पॅनिश भाषा शिकूं लागतील असें भाकीत करावेंसें वाटतें! ते डच व पोर्तुगीज भाषा शिकत आहेत यांत कांहीं वाईट नाहीं, पण इकडे तिकडे वणवण हिंडावयाचें, खाणें-पिणें जेथें जें मिळेल त्यावर भागवावयाचें, यामुळें त्यांची प्रकृति बिघडत असल्याचें ऐकून वाईट वाटतें. काशी ढवळे ही त्यांच्या चांगल्या ओळखीची आणि आवडती होती हें तुला ठाऊक आहेच. "लग्न करण्याचा पुनः मोह होत आहे, पण कष्टानें मी आवरीत आहें" असें तुरुंगांतच त्यांची एकदां जी चोरून मुलाखत झाली तींत त्यांनींच कबूल केलें. ऐतिहासिक जिज्ञासेच्या पाठीमागें लागून स्वतःचा नाश करून घेत आहे झालं. (देशभक्तीच्या नादीं लागून मीहि तेंच करीत आहें!) मी लवकरच तिकडे येईन.

कोंकणांतील लोणगांव तालुक्यांतील पांचबावडी या गांवीं राहून तेथें ग्राम-सुधारणेचें काम करावें म्हणतों. गांवाची निवड कशी काय वाटते? मूळ योजनेलाच जर विरोध असेल, म्हणजे असल्या फंदांत मी इतःपर पडूं नये असेंच जर तुला वाटत असेल तर मात्र मला सर्व गोष्टींचा पुनः विचार केला पाहिजे. कारण तुझ्या दृष्टीनेंहि मला पाहण्यास शिकलें पाहिजे हें मी जाणतों. मनांतलें खरेंखरें कळवावें.

तुझा देशवेडा पति,
**विनायकराव भोळे**

---

## [२४] म्हसकरांची शिकवणी बंद

पुणें.
ता. ९–११–२३.

मित्रवर्य भोळे यांस सा. न. वि. वि.

आपण, सरला, व छोटू पांचबावडीस आनंदानें राहत आहांत आणि गावांत आपणांस मानमान्यता मिळत आहे हें ऐकून समाधान झालें. वास्तविक तुम्ही शहरांत राहणारे प्रोफेसर व्हावयाचेत, पण खेड्यांतील पुराणिक आणि वैद्य व्हावेंत अशी ईश्वराची इच्छा होती. हेंहि कांहीं वाईट नाहीं! रात्रींची शाळा कशी चालली आहे तें कळवावें. आपण पगारी मास्तर ठेवावा, मास्तराचा पगार मी देत जाईन. स्वतःचा मौल्यवान् वेळ दवडूं नये. आपण गीतेवर एखादें पुस्तक लिहावें अशी इच्छा आहे. तरी वाचन करीत रहावें, लहान गोष्टी इतरांकडून करून घ्याव्यात. (पण हें तुमच्या हातून होईल असें दिसत नाहीं. प्रत्येक ठिकाणीं स्वतः मरावयाचें ही आपली खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं!)

इकडची बातमी अशी, कीं बिन्दुमाधव म्हस्कर यांची शिकवणी बंद झाली आहे. मी कांहीं एक बोललों नाहीं. इंदूलाच कांहीं तरी अनुभव आला असला पाहिजे आणि तिनेंच त्यांना सांगितलें असलें पाहिजे. ते मधून मधून येतात, पण इंदु त्यांच्याशीं तुटकपणेंच वागते असें मला तरी दिसतें.

अप्पांची प्रकृती त्यांतल्या त्यांत बरी आहे. मुलीकडून नातवाचें मुख पाहाण्याचें सुख लाभलें त्याप्रमाणें मुलाकडूनहि नातवाचें मुख पाहाण्याचें सुख लवकरच मिळण्याचा रंग आहे असें ते बोलत असतात. मला हें ऐकतांना लाज वाटते, पण प्रेमळ म्हाताऱ्या वडिलांना मी काय शिकवणार? इंदूलाहि पुत्रमुख पाहाण्याची इच्छा फार दिसते! छोटूच्या लीलांचें ती वर्णन करीत असते त्यांत त्याचें कौतुक करावें ही इच्छा आहे का आपणांलाहि असाच मुलगा असावा अशी गुप्त वासना आहे हें कोण सांग-

णार ? ईश्वराची तशी इच्छा असल्यास छोट्टूच्या ऐवजीं एखाद्या " छोटी " वरच तिला समाधान मानून घ्यावें लागेल. आणखी चार पांच महिने वाट पाहिली म्हणजे सगळ्या गोष्टी स्पष्ट होतीलच. मला इतका वेळ काय सांगावयाचें होतें तें आतां कळलेंच असेल.

आपला मित्र व मेहुणा,

**भाऊ काळे**

---

## [ २५ ] गरिबींतला आनंद

पांचबावडी,

१-१-२४.

प्रिय भाऊ यास सरलेचे नमस्कार वि. वि.

आमचे दिवस येथें गरिबींत पण फार सुखांत जात आहेत. गांवांत मानमान्यता वाढत आहे. आमच्या आनंदाला पारावार नाहीं. गैरसमजुती होतात, पण छोट्टूच्या लाडासंबंधानें. भांडणें होतात, पण तीं छोट्टूच्या कौतुकासंबंधानें. मतभेद आहेत, पण ते छोट्टूवर अधिक प्रेम कोणाचें याबद्दल. आणि खरें बोलावयाचें म्हणजे अधिक प्रेम कोणाचें आहे हें सांगतां यावयाचें नाहीं. त्याला माझ्यापेक्षां यांचा फार लळा आणि हेहि न लाजतां आणि त्रास न मानतां त्याला नेहमीं घेतात. बाजारांत जातांना, फिरायला जातांना, फार काय रोगी पाहण्यास जातांना सुद्धां तो त्यांचे बरोबर असावयाचाच. इतके लाड करणें या गांवांतल्या चालीप्रमाणें प्रशस्त नाहीं, पण लोकमताला कधींहि भीक घालावयाची नाहीं, आपल्या मनाला योग्य वाटेल तें करावयाचें, हा जन्मस्वभाव ठाऊकच आहे. आजकाल मला तर छोट्टूच्या तैनातीला असण्याशिवाय दुसरा धंदा नाहीं. आमच्या छोट्या राज्यांत छोट्टू हा राजा आणि आम्ही त्याचे तैनातदार. " छोट्टू पुराण " तुला कंटाळवाणें होईल म्हणून पुरें करतें. एक गोष्ट मात्र सांगत्यें. छोट्टूचे बोबडे बोल ऐकून इतका आनंद होतो कीं

तो आम्हांला दोघांनाच ठाऊक. प्राकृत भाषा ज्याला शिकावयाची असेल त्यानें छोटूनें शब्दांचीं केलेलीं अपभ्रष्ट रूपें पहावींत, म्हणजे त्याला "महाराष्ट्री" वगैरे प्राकृत भाषांचे नियम आपोआप समजतील, असें म्हणावयाचें असतें. प्राकृत भाषेचा तो माझा गुरू आहे असें म्हणून कधीं कधीं त्याला "गुरुराज" ही पदवी तिकडून दिली जाते !

आपली प्रकृति कशी आहे तें कळवावें. इन्दुवहिनींच्या बाळंतपणा-करितां मला तिकडे यावयाची इच्छा आहे, पण बायकांच्या इच्छा मनांतच रहावयाच्या. तिला बरें वाटत नसल्यास मात्र संकोच न धरतां कळवावें, म्हणजे मी (वाटल्यास थोडासा हक्क गाजवूनहि) येईन.

**सरला**

---

## [ २६ ] स्त्रिया इतक्या धीट झाल्या आं ?

पांचबावडी,
५–१–२४

मित्रवर्य भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

येथें माझें चांगलें बस्तान बसलें आहे. माझें पुराण मोठें विद्वत्तापूर्ण आणि देशाभिमानयुक्त असतें अशी इकडच्या प्रांतांत माझी कीर्ति झालेली आहे. वैद्यकीहि उत्तम चालली आहे. चार इंग्रजी आणि संस्कृत वैद्यकीचीं पुस्तकें वाचून उत्तम वैद्य बनलों आहें ! बुद्धिमत्तेपेक्षां चांगल्या नशिबानेंच मला हात दिला आहे. कांहीं बरे न होणारे रोगी बरे झाले ते वास्तविक आपल्या दैवानें झाले, पण श्रेय मला मिळालें. एक लहान ५–६ महिन्यांचा मुलगा फार आजारी होता; श्रीमंताचा असल्या-मुळें इकडचे सगळे वैद्य आणि डॉक्टर यांचीं औषधें दिलीं, पण गुण आला नाहीं. सहजगत्या मी त्यांच्याकडे गेलों असतां मुलाला त्यांनीं दाखविलें. मी नाडी, छाती वगैरे तपासली, आणि मुलाच्या आईजवळ बोलतां बोलतां अंगावरचें दूध कसें आहे तें विचारलें. तें दाट आहे

असें ऐकल्यावर मूळ रोगाचें कारण ध्यानांत आलें. मुलाला वास्तविक तें दूध पाण्यांत मिसळल्याशिवाय पचणें शक्य नव्हतें, पण लहान मुलाला पाणी कसें द्यावयाचें या भीतीनें घरांतल्या बाया पाणी देत नव्हत्या. मी नंतर औषध पाठवून दिलें त्यांत पाण्याशिवाय कांहीं नव्हतें, तें दोन दोन तासांनीं न चुकतां चमचा चमचा द्यावयाचें असें सांगितलें होतें. चमत्कार असा कीं मुलाला पाणी मिळाल्यामुळें गुण येऊं लागून तें लवकरच गुटगुटीत झालें, आणि मी गांवांतला धन्वंतरी बनलों! माझ्या हाताला यश आहे अशी गांवांतल्या लोकांची कल्पना या यशामुळें दृढ झाली आणि मी देशभक्त, विद्वान, वक्ता, समाजसेवक, स्वार्थत्यागी, अशा नात्यानें माझी जी कीर्ति झाली होती त्यांत या कीर्तीची भर पडली. झालेला खरा प्रकार मी गांवांत कोणाशीं बोललों नाहीं. वैद्यकीच्या धंद्याला थोडीशी लुच्चेगिरी लागते, ती आतां शिकलों आहें!

परवां काशी ढवळे ही नारायणराव पाठक येथें आहेत असें समजल्यावरून येथें आली. येथून जवळच असलेल्या पाटघर गांवीं तिचा मामा आहे त्याच्याकडे जाण्याचें तिनें निमित्त केलें आणि धाकट्या भावाला घेऊन वाटेंत एक दिवस विश्रांति घेण्याकरितां म्हणून माझ्याकडे उतरली. चहापाणी, अंघोळी, जेवणें वगैरे झाल्यावर मला तिनें पडवींत एकीकडे बोलावून आमचें लहानपणापासूनचें प्रेम आहे, नारायणरावांच्या इतिहाससंशोधनाच्या आड मी येणार नाहीं, दारिद्र्यालाहि मी भीत नाहीं, वगैरे गोष्टी मला तिनें सांगितल्या आणि नारायणरावांचें मन वळविण्याविषयीं अश्रुविसर्जनपूर्वक विनंति केली. मला तिची ती स्थिति आणि कृति पाहून प्रथम चमत्कारिक वाटलें पण पुढें गहिंवर येऊन "मला शक्य तें करतों" असें मी तिला अभिवचन दिलें. गहिंवरून गेल्यामुळें मला भान राहिलें नाहीं आणि पाठीवरून हात फिरवून मी तिला धीर दिला आणि रडणें थांबविण्यास सांगितलें! आमच्या सरलाराणीसाहेब यांनीं पडवींत एकीकडे चाललेला हा प्रकार पाहिला आणि त्याचा सरळ अर्थ केला! झालें, हिंवाळ्यांतल्या त्या दिवशीं पावसाळ्याची झिमूझिम्

सुरू झाली. ईश्वरकृपेनें गडगडाट मात्र झाला नाहीं. सगळ्या गोष्टी समजावून सांगितल्या पण समजूत पटेना. ऐन वेळेला छोटू आल्यामुळें मात्र पावसाळा संपला आणि थोड्या वेळानें कोंवळें ऊन सुरू झालें. तात्पर्य काय तर भावनाप्रधान स्वभाव असल्यामुळें आम्हांला स्वतःला वागतांना पोंच रहात नाहीं आणि मग असे पेंचांत सांपडतों ! छोटूसारखे सज्जन जगांत आहेत म्हणून आम्हीं संकटांतून कसे बसे निभावून जातों एवढेंच !

नारायणराव पाठकांना पुष्कळ सांगून पाहिलें. पण त्यानें तिच्या देखत मला म्हटलें, " विनायकराव, एकदां सांगितलें तेंच तुम्हीं शंभरदां विचारलें तरी मी सांगणार. याबाबत माझी आपण पुनः मुलाखत घेऊं नये. काशीनेंहि घेऊं नये. मला असल्या कुमकुवत करणाऱ्या मुलाखती व मुकाबले आवडत नाहींत. आपण मध्यस्थी न केलेली चांगली; केल्यास तुमच्या आमच्यामध्यें बेदिली उत्पन्न होईल. " नंतर त्यांनीं काशीलाहि एकीकडे गांठून असेंच कांहीं तरी सांगितलें. बिचारी दिवसभर रडत होती. ती काल मामाकडे पाटघरला निघून गेली. बायका इतक्या धीट झाल्या असतील अशी मला कल्पना नव्हती. पण दीड वर्षे तुरुंगांत आणि आतां खेडेगांवांत राहिल्यामुळें शहरांतील प्रगति किती झपाट्यानें होत आहे हें कदाचित् मला कळत नसेल ! बाकी खरें बोलावयाचें म्हणजे मला काशी ढवळे हिचा धीटपणा आवडला आणि नारायणरावाचा हटवादीपणा आवडला नाहीं. पण आपल्या आवडीनिवडीचा काय उपयोग ?

**विनायकराव भोळे**

ता. क.

चिरंजीव छोटू आनंदांत आहे आणि आम्हांला आनंदवीत आहे. तुम्हांलाहि लवकरच पुत्रसुखाचा अनुभव येवो असें इच्छितों.

**वि. भो.**

———

## [ २७ ] संकटांची सावली

पांचबावडी,
ता. १०–१२–२४.

प्रियमित्र भाऊराव काळे यांस विनायकराव भोळे याचा सा. न. वि. वि.

रात्रींच्या शाळेकरितां, सामाजिक कार्याकरितां आणि आमच्या खाजगी खर्चाकरितां आपण जेवढे रुपये पाठवितां तेवढे सगळे मी सामाजिक कार्यांत खर्च करून टाकतों हा माझा कदाचित् दोष असेल; पण ही खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं. कारण माझ्या भोंवतीं मला इतकें दारिद्र्य दिसतें आणि मदतीची इतकी जरूर भासते, कीं जवळ पैसे असतां ते पेटींत ठेवणें माझ्या जिवावर येतें. दुसरें असें, कीं आपण माझ्यावर दया करून मदत करतां तशी मी इतरांवर करावयास नको काय? तिसरें असें, कीं माझ्यासारख्या वृत्तीच्या लोकांनीं आपण होऊन स्वीकारलेल्या दारिद्र्याच्या दीक्षेला सुसंगत वागावयाचें म्हणजे असेंच वागलें पाहिजे, नाहीं तर लोकांमध्यें भलतेच गैरसमज उत्पन्न होतील आणि "फंडगुंड"–पणाचे आरोप येतील. आणि अगदीं खरें कारण सांगावयाचें म्हणजे सभोंवार इतकें दारिद्र्य आणि इतक्या आपत्ति "आ" पसरून आहेत, कीं अशा परिस्थितींत अनवश्यक सांपत्तिक सुखोपभोग घेणें माझ्या जीवावर येतें, इतकेंच नव्हे तर तें मला पाप वाटतें. शिवाय, माझ्यासारख्यांना मुलांमुलींना शिक्षण देतांना, गरिबांना फुकट औषधपाणी देतांना, आपद्ग्रस्तांच्या आपत्ति दूर करतांना, स्नेह्यांसोबत्यांमधील गैरसमज दूर करतांना, गांवांतील लोकांमधील तट मोडतांना ( व मधून मधून तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें "व्याख्यानबाजी आणि अध्यक्षगिरी" करतांना ! ) इतका आध्यात्मिक आनंद होत असतो, कीं इतर सुखोपभोगांची लालसाच शिल्लक रहात नाहीं. द्राक्षें मिळाल्यावर करवंदें कोण खाईल? अंजीर खाऊन पोट भरल्यावर उंबरांकरितां कोण धडपड करील? ( लाडिकपणानें हट्ट करणाऱ्या छोटूला

कडेवर घेऊन सौभाग्यवतीनें चहा आणलेला आहे तो पाहून सुचलेली उपमाहि येथें लिहितों आणि ५/१०मिनिटें चहा पिण्याकरितां आणि सौ. शीं बोलण्याकरितां थांबतों. उपमा अशी कीं, अशी पत्नी आणि असा मुलगा आणि असा चहा आणि असा प्रेमपूर्ण देखावा ज्याच्या भाग्यांत आहे तो बाजारांतल्या एखाद्या नादान स्त्रीच्या दुकानांत जाऊन दारू कशाला पिईल ? )

* * *

माझी वैद्यकी उत्तम चालली आहे. खेड्याच्या मानानें पुष्कळच पैसे मिळतात. भाजीपाल्यांच्या देणग्या पुष्कळ मिळतात. माझ्या पुराणाला संध्याकाळीं गांवांतील पुष्कळ लोक येतात. बायका येतात पण त्या कापूस पिंजीत किंवा वाती करीत असतात ! त्या माझ्या विद्वत्तेची फार स्तुति करतात आणि ती ऐकून मी धन्य होतों ! ! आप्पासाहेबांना आपल्यासारख्या श्रीमंताचा जावई खेड्यांत दरिद्र्यासारखा राहतो हें दुःखदायक होत असेल, पण सुख आणि समाधान या बाबतींत मी (आणि सौभाग्यवतीहि) दारिद्र्यांत खास नाहीं, हें त्यांना समजावून सांगावें.

रात्रींची शाळा कशीबशी चालली आहे. सौभाग्यवतीहि सवड सांपडेल तेव्हां माझ्या सोबतीला येऊन मुलांमुलींना शिकविते. इतके दिवस शाळा एका पडक्या झोंपडींत घेत होतों, ती आतां देवळाजवळील धर्मशाळेंत आणली आहे. कांहीं लोक विरुद्ध होते, कारण शाळेंत अस्पृश्य मुलें आहेत; परंतु होतें–नव्हतें तेवढें वजन खर्च करून धर्मशाळेंत शाळा आणण्याची परवानगी मिळविली. मी पुण्यास असतांना अस्पृश्यांशीं उघडपणें रोटी–व्यवहार केला आहे; पण येथें करणें इष्ट का अनिष्ट याबद्दल निश्चय होत नाहीं. बहुधा लवकरच लोकमताला धाब्यावर बसवीन असें वाटतें. स्पर्शास्पर्श मात्र मानीत नाहीं. पुराणिकाच्या पेशाला वास्तविक हें झेंपावयाचें नाहीं, पण (खऱ्या किंवा काल्पनिक) विद्वत्तेच्या कीर्तीवर आणि वैद्यकींत उपकार करून ठेवलेल्यांच्या कृतज्ञताबुद्धीवर आतांपर्यंत

तरी सगळें धकून गेलें आहे. घारूअण्णा नागे, कृष्णंभट फुरशे, वगैरे सनातनी धर्मांचा खोटा अभिमान बाळगणारी टवाळ आणिं फसवी मंडळी मनांतल्या मनांत (आणि थोडेबहुत जनांत) जळफळत आहेत, पण पांडुरंगशास्त्री अभ्यंकर यांच्यासारखा शास्त्री आणि नारायणराव काणे यांच्यासारखा घरंदाज श्रीमंत मनुष्य माझ्या बाजूला असल्यामुळें माझा सुधारकीपणा आतांपर्यंत तरी पचला आहे. योग्य संधि सांपडल्यावर नागे, फुरशे वगैरे लोक कदाचित् फणा उभारतील आणि दंश करतील, आणि कार्यांत विघ्नें उत्पन्न करतील अशी भीति आहेच म्हणा! माझ्यापुढें असा प्रश्न उभा राहतो कीं समाजाला चुचकारून घेऊन थोडेंसेंच कार्य कां होईना, पण सगळ्यांना बरोबर घेऊन करावें, का लबाड पण भेकड लोकांना न मितां तत्त्वनिष्ठेनें सुचविलेलीं मोठीं कार्यें करण्यास लागून, आपत्तींना आणि धोक्यांना धैर्यानें तोंड द्यावें? धैर्यानें तोंड देण्यास मी भितों असें नाहीं, पण मोठा घास घेऊं लागल्यानें कार्यविनाश तर व्हावयाचा नाहीं ना अशी भीति वाटते.

इंदुवहिनीनें बिंदुमाधव म्हसकरांची शिकवणी बंद केली आणि त्यांच्याकडे जाणेंयेणेंहि कमी केलें आहे, हें ठीक झालें. पण हें सगळें अगदीं मनापासून आहे, का पतीच्या आग्रहास्तव आहे? त्यांचें मला एक पत्र आलें होतें, त्यांत त्यांनीं संशयी पतीच्या अवास्तव शंकेखोर-पणापुढें दीनपणें मान वांकवावी, का आपली गाणेंबजावणें शिकण्याची सात्विक हौस पुरवून घ्यावी असा मला प्रश्न विचारला होता. 'म्हसकरां-सारखा कसबी आणि शिकविण्यांत वाकबगार असा मास्तर मिळत नाहीं म्हणून त्यांचेबद्दल कांहींहि कंड्या पिकल्या तरी मी त्यांना शिक्षक म्हणून ठेवूं इच्छित्यें' असें तिनें त्या पत्रांत म्हटलें होतें. मी या पत्राचें उत्तर "**नरो वा कुंजरो वा**" अशा पद्धतीचें दिलें होतें आणि लवकरच समक्ष भेटल्यावर सगळी चर्चा करूं असें आश्वासन दिलें होतें.

सौ. ची प्रकृति उत्तम आहे. ती मला हरतऱ्हेनें सामाजिक व बौद्धिक

कार्यांत मदत करते,—ती खरी "सहधर्मचारिणी" आहे. आनंदांत असते, पण छोटूला श्रीमंती कपडे व अलंकार वगैरे करतां येत नाहींत, एवढ्याकरतांच फक्त माउलीला वाईट वाटतें. आपण कौतुकानें उंची कपडे पाठवितां आणि अलंकारहि पाठवितां पण आपण स्वतः मुलाला उंची कपडे करूं शकत नाहीं म्हणून बिचारीला वाईट वाटतें. स्त्रीहृदय असें आहे.

मी स्वतः छोटूचें बोट धरून, किंवा त्याला हातावर घेऊन ( किंवा कधीं कधीं खांद्यावर घेऊन ) मित्रांकडे किंवा बाजारांत जातों आणि त्यांत धन्यता मानतों ! लोक मला चमत्कारिक म्हणतात आणि हंसतात; पण छोटूच्या आनंदपूर्ण हास्यापुढें लोकांच्या हंसण्याची किंमत काय ? कळावें.

आपला,

**विनायकराव भोळे**

---

## [२८] खरा थोरपणा कोणाचा ?

पुणें.

ता. १-१-२५.

प्रियमित्र विनायकराव भोळे यांस भाऊराव काळे याचा साष्टांग नमस्कार, वि. वि.

इतके दिवस पत्राचें उत्तर दिलें नाहीं याचें कारण असें कीं पैशाची कमाई करून देणारीं कंत्राटें मला फुरसतच मिळूं देत नसत, हें कारण अंशतः खरें असलें, तरी अगदीं खरें कारण असें, कीं माझ्या मनांत ( कादंबऱ्यांत वर्णन केलेला असतो तसा ) अंतःकलह सुरू होता आणि काय करावें हें सुचत नव्हतें म्हणून लिहिण्याकडे माझी प्रवृत्तीच होत नव्हती.

आज इंग्रजी नव्या वर्षाला सुरवात झाली, तेव्हां मनांत विचार आला, कीं आज कांहीं तरी नवीन अशा सत्कृत्याला आरंभ करावा. विचार करतां करतां असें वाटलें, कीं सौभाग्यवतीच्या मनांतील खराखरा प्रकार समजावून घेऊन तिला सुख होईल आणि तिच्या अंतरात्म्याच्या विकासाला पूर्ण वाव मिळेल असें आपण वागावें. मी लगेच तिला बोलावून घेतली व "बिंदुमाधवांची शिकवणी तूं आपण होऊन आपखुषीनें बंद केलीस का मला दुःख होऊं नये म्हणून बंद केलीस?" असें विचारलें. तिनें एकदम जरी नाहीं, तरी हळू हळू जें काय होतें तें सगळें कबूल केलें. मी तिला सांगितलें कीं "उद्यांपासून शिकवणी सुरू कर. मला दुःख होऊं नये म्हणून एवढा स्वार्थत्याग करण्याची तूं तयारी दाखविलीस आणि आपल्या गाण्याबजावण्याची हौस मनांतल्या मनांत दाबून टाकलीस हा तुझा थोरपणा आहे. प्रांजळपणें या गोष्टी कबूल केल्यास हा त्याहून अधिक मोलाचा थोरपणा आहे. पण तुझ्या हौशीच्या आड मी येणें मला प्रशस्त वाटत नाहीं. इंग्रजी सनाचा आज पाडवा आहे, या सुमुहूर्तावर मला एका पुण्यकार्याला प्रारंभ करूं दे. मी संशयखोरपणा सोडला म्हणून समज." तिनें बरेचसे आढेवेढे घेतले, (मनापासून आढेवेढे घेतले) पण मी अर्धवट थट्टेनें "पतीची ही आज्ञा आहे, तूं मानलीच पाहिजेस" असें म्हणून शिकवणी सुरू करण्याबद्दल तिची संमति घेतली.

कला–प्रेम आणि पति–प्रेम यांतील विरोध अशा रीतीनें थांबविला; पण पुनः पुनः प्रश्न डोकावतो, कीं यांत धोका तर नाहीं? लोक माझी कुचेष्टा करतात त्याचें मला कांहीं वाटत नाहीं, पण इन्दुमतीला हें स्वातंत्र्य दिल्यामुळें एखादवेळेस मोह होऊन तिची नीतिमत्ता बिघडेल कीं काय, ही खरी भीति आहे.

पण आतां ही भीति आणि ही डर "पीछे रही,"—आजपासून उच्चतम जीविताला आरंभ झाला, आणि सात्त्विक पत्नीच्या सात्त्विक कलाप्रेमाच्या आड येणाऱ्या माझ्या संशयखोरपणाला आज हृदयांतल्या प्रेमांत जलसमाधि मिळाली!

अप्पा आजारीच आहेत, पण त्यांतल्या त्यांत समाधान मानण्याचा प्रयत्न करीत असतात. आपणांस सवड असल्यास "सह" यावें. बाकी, स्वदेशीवर व्याख्यानें, भारतभागवतावर पुराणें, वैद्यकी, रात्रीची शाळा, आणि "सरला" व "छोटू" यांच्या तैनातींत असणाऱ्याला सवड कोठली मिळणार ? तुम्हांस येणें शक्य नसल्यास सरलेला सरळ मोटारींतून इकडे पाठवावें. छोटूचा कांहीं दिवस विरह सोसावा लागेल, पण तो सोसावा. सौभाग्यवतीतर्फें हा निरोप आहे. कारण आपल्या सौभाग्यवतीस कळेल.

आपला मेहुणा व मित्र,
**भाऊ काळे**

---

## [२९] राजकारण व समाजकारण दुऱ्लग असावें

सुपें,
ता. २१-९-२५.

मित्रवर्य विनायकराव भोळे मु. पांचबावडी यांस नारायण पाठक मुक्काम सुपें याचे नमस्कार. आजतागायत सर्व कुशल आहे. आपलेंहि कुशल कळवावें.

पत्र लिहिण्यास कारण कीं, सुपें येथें आज मला एक शके १६०१ मधील, म्हणजे शिवकालीन, निवाडापत्र सांपडलें आहे. पत्राच्या अखेरचीं अक्षरें शिव-प्रभूचीं असावींत. तींच ठरलीं तर वादाचा एक मोठा प्रश्न सुटेल, इतकेंच नव्हे तर पुण्य अक्षरें पाहण्यास मिळून महाराष्ट्राच्या डोळ्यांचें पारणें फिटेल !

पत्र लिहिण्याचें दुसरें कारण असें कीं, काशी ढवळे ही साखरपें येथें असून आजारी आहे असें कळलें. मी तिकडे पत्र लिहीत नाहीं, आणि तिकडूनहि मला पत्रें येऊं नयेत असें मी त्यांना फर्माविलें आहे म्हणून आपण परस्पर चौकशी करून कळवावें. माझें मन प्रेमानें ओढ घेत

आहे आणि लग्नाला अनुकूल होत आहे असें नव्हे, तर साहजिक जिज्ञासे-मुळेंच मी हें लिहीत आहें. ( बाकी आपणहि चौकशी करूं नये असेंच आतां वाटूं लागलें आहे. )

पुण्यास असतांना सौ. इंदुवहिनी व म्हस्कर यांचेबद्दल जें ऐकलें तें लिहवत नाहीं. भाऊरावांना हें कळवूं का नको, आणि कळवावयाचें असल्यास कसें कळवूं, याबद्दल मनाचा निश्चय होत नाहीं. पतिपत्नींमध्यें फारसें रहस्य दिसलें नाहीं. छोटी खुशाल आहे. लहान मुलांचे किरकोळ आजार असतात ते आहेतच. पण विशेष काळजी करण्याचें कारण नाहीं, असें वाटतें.

महात्मा गांधी हे पुनः सत्याग्रह करण्याचे विचारांत आहेत असें तुमच्या पत्रावरून दिसतें. सत्याग्रह सुरू झाल्यास आपण त्यांत पडाल हें मी ओळखून आहें. पण रामदासांनीं शिकविलेला आपला "महाराष्ट्रधर्म" निराळा आहे. राजकारणामध्यें आधीं अनंत गुप्त तजविजी, अनेक चाळणा कराव्या लागतात; राजकारण हें एक-लग असूं शकत नाहीं तर तें दु-लग असावें लागतें; लोकांचा वकूफ काय याकडे दुर्लक्ष करून आध्यात्मिक भाषेच्या जोरावर लोकांच्या मनांत भलताच हांवभरीपणा उत्पन्न करून त्यांचा दीप–पतंगवत् नाश करण्यांत मुत्सद्दीपणा नाहीं;—हीं तत्त्वें गांधींनीं रामदासांपासून शिकावींत, पण ते स्वतःला एकमेव अक्कलमंद समजतात; ते कशाला रामदासांची शिकवण ऐकतील? राजकारण हें फकिरांचें क्षेत्र नाहीं. "अल्लाला फकीर प्यारे असतात, आणि सैतान त्यांना भिऊन असतो," असें एक उर्दु कवि म्हणतो, पण गांधी–फकिराच्या चळवळीमुळें होऊं पहाणारें प्रचंड नुकसान पाहून "अल्ला हा अशा देशबुडव्या फकिरांना डरतो, आणि सैतानाला ते प्यारे आहेत", असें मला म्हणावेंसें वाटतें.

सरला–वहिनी रात्रीच्या शाळेंत काम करतात हें ठीक आहे. पण छोटूला दूर लोटून त्या हें करीत असतील तर तें योग्य नव्हे. छोटू आजारी आहे असें ऐकतों म्हणून हें लिहिलें. होतां होईल तों बायकांनीं असल्या

फंदांत फार पडूं नये. पण अपवाद मानण्यास मी तयार आहें. पण आपल्या ध्येयनिष्ठेमुळें आणि सरलावहिनींच्या पतिनिष्ठेमुळें छोटूकडे दुर्लक्ष व्हावयाचें अशी भीति वाटते. छोटूबद्दल माझ्यापेक्षां आपणांस अधिक काळजी आहे हें मला मान्य आहे.

अस्पृश्य लोकांशीं रोटीव्यवहार करण्यास तत्त्वतः हरकत नाहीं, पण राजकारणाप्रमाणें समाजकारणहि " दु-लग " असलें पाहिजे. " सावधपण सर्व विषयीं " ठेवून सर्वबाजूंनीं विचार करून दूरंदेशीपणानें वागावें, नाहीं तर पस्तावा होईल.

**नारायण पाठक**

**ता. क.** काशी ढवळेबद्दल साखरप्यास पत्र लिहूंच नये.

**नारायण**

---

## [ ३० ] " ध्येयें म्हणजे दुःखें " हेंच खरें

पुणें.

ता. १०–९–२५.

रा. विनायकराव भोळे यांस सौ. इन्दुमती काळे हिचे साष्टांग नमस्कार वि. वि.

मी आपणांस सहसा पत्रें लिहीत नाहीं, महत्वाची गोष्ट असेल तेव्हांच लिहित्यें, हें आपणांस ठाऊकच आहे. आतांचा माझ्यापुढचा प्रश्न मला फार महत्वाचा वाटतो म्हणून लिहीत आहें.

मी बिन्दुमाधव म्हस्करांची शिकवणी बंद केल्यावर पुनः ती कां सुरू करण्यांत आली हें सर्व तुम्हांला ठाऊकच आहे. ज्या थोर अंतःकरणानें बिन्दुमाधवांच्या शिकवणीस पुन्हां आरंभ करून दिला त्या अंतःकरणांत संशयाचें विष पुनः कोणी तरी कालविलें आहे. आमची " छोटी " होती तोंपर्यंत आमचे दिवस फार आनंदांत गेले. आमच्यांतील भेदभाव एवढ्याश्या त्या छोटीनें पार घालवून टाकला होता. पण ती देवानें

नेल्यापासून पुन्हां संशयपिशाचिकेनें मनांत जोर केला आहे. मला रागाचा शब्दहि बोलत नाहींत परंतु मन शुद्ध नाहीं. मला कोणत्याहि गोष्टीची ना नाहीं, परंतु माझ्याबरोबर बोलण्याचालण्यांत आतां राम वाटत नाहीं. माझ्या सगळ्या हौशी पुरवितात, परंतु स्वतःला कशाची हौस नाहीं. बाह्यतः सगळ्या गोष्टी चांगल्या आहेत, पण मनें विलग झालेलीं आहेत. मनांतला खरा भाव लपविण्याकरितां मुद्दामच मला कांहीं तरी आणून द्यावयाचें, मुद्दामच मला फिरावयास न्यावयाचें, कांहीं तरी निमित्त करून कृत्रिम विनोद करावयाचा, मला खूष करण्याबद्दल खोटाच उत्साह दाखवावयाचा; परंतु मन मनाला ओळखतें. इवलीशी छोटी होती तिला देखील रागाचा खोटा आविर्भाव कोणता आणि खरा राग कोणता हें कळावयाचं; प्रेमाचा पान्हा कोणता आणि प्रेमाचा देखावा कोणता हें समजायचं; आमच्या चंपी कुत्रीला देखील हें समजतं; मग माझ्यासारखीला का तें कळावयाचं नाहीं ? मला मनापासून ते रागावले तर आवडेल, पण राग गिळून प्रेमाचं सोंग केलेलं आवडत नाहीं. मला वाईट वाटूं नये म्हणून कर्तव्यबुद्धीनेंच ते मनांतला संशय आणि राग गिळतात; पण हेंच मला डांचतं. त्यापेक्षां गरळ ओकून टाकलेलं बरं. माझ्यावर खरं प्रेम नाहीं, आपलेपणा वाटत नाहीं, म्हणूनच रागवत नाहींत हें न समजण्याइतकी मी खुळी नाहीं. अनेक महिने हें असं चालल्यामुळें माझ्या मनांतहि एक प्रकारची अढी म्हणा किंवा तेढ म्हणा उत्पन्न झाली आहे. मीहि कधीं उलट बोलत नाहीं, रुसत-रागवत नाहीं, पण आंतून उत्साह नाहीं, आनंद नाहीं. उन्हाळ्यांतल्या दुपारचा उकाडा पंख्यांनीं कसा लोपणार ?

बिन्दुमाधवांशीं मात्र मी मनापासून बोलत्यें-चालत्यें, याबद्दल माझें मलाच वाईट वाटतें. पण त्यांनीं एकदा जरी किंचित् अतिप्रसंग केला असला तरी ते जात्या वाईट नाहींत अशी माझी खात्री आहे. कसलेल्या लेखकाच्या हातून एखादे वेळेस एखादें वाक्य चुकीचें गेलें म्हणून तो लेखक वाईट ठरेल काय ? त्यानें एखादी अश्लील कोटि लिहिली म्हणून तो अश्लील लिहिणारा म्हणावयाचा काय ? बिन्दुमाधवांच्या स्वभावाबद्दलहि

माझें असेंच म्हणणें आहे. त्यांचें विनोदप्रचुर बोलणें आणि त्यांचें गाणें ज्याला आवडणार नाहीं तो मनुष्यच म्हणतां येणार नाहीं. कर्तव्य म्हणून त्यांची शिकवणी मागें बंद केली तशी आतांहि करण्यास तयार आहें. पण तसें विचारलें तर तेंहि पसंत नाहीं! अशा स्थितींत कसें वागावें? पावसाळ्यामध्यें आभाळांत ढग आले म्हणजे फिरण्यास जावें का न जावें अशी स्थिति होते, तशी माझी झाली आहे.

बाकी अलीकडे मला असा प्रश्न पडूं लागला आहे, कीं शिकवणी तरी कां बंद करावी आणि त्यांच्याशीं बोलणें—चालणें तरी कां सोडावें? फिरावयास जावयाचें ठरल्यावर पाऊस पडेल ही भीति कां बाळगावी? रेनकोट असल्यावर पावसाची भीति कशाला? वरील प्रश्न पुनःपुन्हां नागाप्रमाणें फणा वर करून माझ्याकडे पाहात आहेत, म्हणून माझी मलाच भीति वाटत आहे. आणि म्हणून हें पत्र मी लिहीत आहें.

तुमच्याशीं मागें अनेकदां बोलणें झालें. त्यांत तुम्ही मला किंवा बिन्दुमाधवांना एखादवेळेस मोह होऊन भलताच प्रकार व्हावयाचा हा मुद्दा वारंवार माझ्यापुढें मांडलात; पण माझ्याविषयीं मला पूर्ण खातरी आहे. बिन्दुमाधवांविषयींहि माझी खात्री असल्यामुळें, तुमचा मुद्दा येथें गैरलागू आहे. माझ्याकरितां का होईना, घटकाभर गृहीत धरा कीं बिन्दुमाधव फार चांगले आहेत आणि मीहि फार चांगली आहें, हें गृहीत धरून नेहमींप्रमाणें उडवाउडवी न करतां पुढच्या प्रश्नाचें सरळ उत्तर यावें. प्रश्न असाः—**आत्म्याची कलाविषयक जी भूक आहे ती लोकापवादादाखल किंवा पतीला उगाच संशय येतो म्हणून दाबून टाकावी काय?**

* * * *

माझी रडकथा संपली. आतां दुसऱ्या गोष्टी लिहित्यें. सरलावन्संची प्रकृति बरी नाहीं हें खरें काय? छोटूलाहि बरें नाहीं असें ऐकत्यें. छोटूला

बहीण झाली आहे. तिचें नांव (माझ्या इच्छेला मान द्यावयाचा असल्यास) छोटी ठेवावें. माझी छोटी गेली ती सरलावन्संच्या पोटीं आली असंच मी मानत्यें! आमच्याकडचे पैसे स्वतःकरितां खर्च न करण्यांत मनाचा मोठेपणा नाहीं; आम्हीं परके आहोंत असा याचा अर्थ होतो. तरी असें करूं नये आणि कुटुंबाचे हाल करून घेऊं नयेत.

नारायणराव पाठक यांनीं काशी ढवळेबद्दल चौकशी करूं नये म्हणून निक्षून सांगितलें तरी तुम्ही साखरप्यास पत्र लिहून चौकशी केलीतच आणि ती झुरत आहे असें कळविलेंतच! त्यांचें मन चुळबुळ करीत आहे. बाहेरून मनाची खंबिरी दाखवितात, पण आंत काय होत असेल याचा अंदाज मला करतां येतो. काशी ढवळे पोर चांगली आहे. आणि नारायणराव पाठकहि चांगले आहेत. पण......ध्येयें म्हणजे दुःखें हेंच खरें, कळावें.

**इंदुमती काळे**

---

## [ ३१ ] नागे–फुरशे फणा काढतात

पांचबावडी,
ता. १५–९–२५.

सौ. इंदुमती काळे यांस विनायकराव भोळे याचा सा. न. वि. वि.

आपलें ता. ९-९-२५ चें पत्र पावलें. मी कुटुंबाचे मुद्दाम हाल करीन असें वाटतें काय? आपण पैसे पाठवितां त्यांपैकीं खाजगी खर्चाकरितां कांहींएक घेत नाहीं हें म्हणणें खोटें आहे. मी घेतों, पण सभोंवतालचें दारिद्र्य पाहून मन इतकें द्रवतें कीं हातीं पैसा आल्यावर हातांत फारसा रहातच नाहीं. आजच बारसें झालें. आपल्या इच्छेला अनुसरून आम्ही आमच्या मुलीला "छोटी"च म्हणतों. पाळण्यांतलें नांव उषा आहे.

आतां आपला प्रश्न. तत्त्वदृष्ट्या पाहिलें तर कलेपुढें सांकेतिक चालीरीतीनें मान वांकविलीच पाहिजे; म्हणजे, लोकांतली खुळचट चालरीत

कलाविषयक ध्येयाच्या आड येत असेल तर आपलें ध्येय सोडण्याचें कारण नाहीं. पण चालरीत खरोखरच खुळचट आहे का, हाच व्यवहारांत प्रश्न पडतो. परपुरुषांशीं फार बोलणें-चालणें असूं नये, स्त्रीपुरुषांनीं एकान्त करूं नये, हे जनरीतीचे निर्बंध खुळचट आहेत? आतां एखादा पुरुष अत्रि, वसिष्ठ, वामदेव किंवा शुक यांच्याप्रमाणें असला आणि एखादी स्त्री अनसुया, अरुंधती, सीता, सावित्री यांच्याप्रमाणें असली तर त्यांनीं देखील हे निर्बंध पाळावेत काय, या प्रश्नाचें उत्तर असें कीं त्यांनीं न पाळले तर चालेल; पण पाळणें उत्तम. विवाहित स्त्रियांवर (व पुरुषांवर) तर अधिक जबाबदारी आहे; कारण आपली कलेची भूक शांत करतांना पतीची (किंवा पत्नीची) हेळसांड होत नाहीं ना, पतीकडे (किंवा पत्नीकडे) दुर्लक्ष होत नाहीं ना, प्रेमामध्यें विघ्न उत्पन्न होण्याचा संभव नाहीं ना, इत्यादि गोष्टीहि पाहिल्या पाहिजेत. तुमच्या मनाची द्विधा झालेली स्थिति वर्णन करतांना तुम्ही दिलेला दाखला चांगला नाहीं, पण त्याचाच आधार घेऊन मी तुम्हांला सांगतों कीं आभाळांत ढग आले तरी वनश्री पाहण्यास वाटलें तर जावें, पण घरीं मूल किंवा पति आजारी असल्यास जाणें योग्य नव्हे.

बिन्दुमाधव वाईट नसतील, नाहींत असेंच मी समजतों, पण स्त्रियांच्या बाबतींत पुरुषांचें मन केव्हां मोहवश होईल हें सांगतां येत नाहीं, हें लक्षांत ठेवावें. स्त्रियांच्या मनाबद्दलहि मी असेंच म्हणेन; पण आमची सौभाग्यवती आणि आपण यांच्या मूर्ति डोळ्यांपुढें उभ्या राहून लेखणी अडते!

*    *    *    *

आतां इकडल्या कांहीं किरकोळ गोष्टी लिहून पत्र पुरें करतों. गोष्टी किरकोळ आहेत; पण कुटुंबांतल्या माणसांना त्या सांगाव्याशा वाटतात, म्हणून लिहितों.

मी शाळेंत अस्पृश्यांना शिवतो आणि घरीं आल्यावर आंघोळ करीत नाहीं म्हणून घारुअण्णा नागे, कृष्णंभट फुरशे वगैरे सनातनी ब्राह्मण गुंडांचा माझ्यावर रोष होता तो आतां बळावत चालला आहे. मला वाळींत टाकण्याच्या ते विचारांत आहेत. ब्राह्मणांच्या आळींत मला भाड्यानें सोईचें घर मिळालें आहे तें त्यांना पाहवत नाहीं, आणि म्हणून ते घरमालकाला सांगून मला तेथून हुसकावून लावूं पहात आहेत. या मालकाच्या मुलीला पटकी झाली होती तेव्हां रात्रींच्या रात्री जागून व अंथरुणाजवळ बसून मी तिला औषधपाणी दिलें आणि बरी केली आणि तो गरीब असल्यामुळें पैसे नांवापुरतेच घेतले म्हणून त्या मालकाला मला घरांतून निघून जा असें एकदम सांगवत नाहीं. तथापि तो गरीब भिक्षुक असल्यामुळें घर सोडावें लागेल आणि गांवांत कोठेंहि घर मिळावयाचें नाहीं अशी थोडीशी भीति आहे.

घर न मिळण्याचें दुसरें कारण असें, कीं राजकारणांत मी थोडासा गांधींचा अनुयायी झाल्यामुळें येथील कांहीं टिळकभक्त माझे शत्रु झाले आहेत. ( बऱ्याच लोकांचा आदर आहे, पण कांहीं थोडे कट्टर टिळकभक्त दुष्टावा करतात, आणि ते गुंड असून त्यांना लोक भितात.) सरकारी अधिकाऱ्यांचा तर रोष आहेच, कारण भातशेतांवरचा वार्षिक धारा देणें दिवसेंदिवस लोकांना परवडत नसल्यामुळें सत्याग्रह करण्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें मी भाषणांत बोलूं लागलों आहें. एकंदरींत परिस्थिति कठीण आहे. पाहूं या काय होतें तें, कांहींहि झालें तरी मी आपलें ध्येय सोडणार नाहीं, हें निश्चित.

शाळेंतली एक अस्पृश्य मुलगी चिंगी नांवाची आहे. ती नऊ दहा वर्षांची असेल पण इतकी चुणचुणीत आहे कीं ब्राह्मणांच्या मुलींनाहि तिच्यापुढें लाजावें लागेल. जराशी गबाळी आणि गलिच्छ आहे, पण स्वभावानें फारच चांगली आहे आमच्या सौभाग्यवतीची ती मोठी लाडकी आहे. ती आमच्या घरीं पुष्कळदां येते आणि सौ. ला लाघवीपणानें

हरतऱ्हेच्या कामांत मदत करते. एक चाळीस वर्षांच्या वरील पाटील शाळेंत येऊं लागला आहे; कारण वाचतां येत नसल्यामुळें एका मारवाड्यानें त्याला कसें नागवलें हें त्याच्या आतां चांगलेंच ध्यानांत आलें आहे. शाळेंत एक मराठा मुलगी आहे आणि चिंगीशिवाय दुसरी एक अस्पृश्य मुलगी आहे. त्या कांहीं ब्राह्मणांच्या मुलींहून गोऱ्या आहेत आणि सुंदर आहेत. बुद्धीनें सामान्यच आहेत. त्यांचेकडे पाहिलें म्हणजे मला घारुअण्णा नागे आणि कृष्णंभट फुरशे यांची आठवण होते, इतकें त्यांच्या चेहऱ्यांत साम्य आहे. कांहीं तरी येथें पाणी मुरत असलें पाहिजे म्हणून चौकशी केली तेव्हां त्यांच्या आयांची चालरीत कशी आहे तें कळलें आणि सर्व उलगडा झाला ! आणि हे नागे–फुरशे लोकांना "सनातनी धर्म" शिकविणार ! ! मुली मात्र स्वभावानें फार चांगल्या आहेत. एक तर इतकी भाबडी आहे कीं तिच्या मनांत स्त्री-पुरुष हा भेदच नसावा. ती माझ्याशीं इतक्या लडिवाळपणानें वागते आणि इतकी जवळ येऊन बोलते–चालते कीं मला लाजल्यासारखें होतें आणि असला देखावा पाहून लोकांना काय वाटेल अशी भीति वाटते. बरें, इतका लाडिकपणा आणि इतकी सलगी करूं नये हें तिला सांगणें देखील माझ्या जिवावर येतें, किंबहुना तिला हें सांगणें पाप वाटतें. कारण जिच्या मनांत कपट नाहीं, काम--वासना काय पदार्थ आहे हें समजतहि नाहीं, तिच्या मनांत अकालीं खोटी लाज आणि कपट उत्पन्न करणें मला पाप वाटतें. असल्या प्रसंगांतून कशी तरी वाट काढून मी वेळ मारून नेतों, पण कामात्मक मोहाचा प्रसंग या कामरहित लडिवाळपणाच्या प्रसंगापेक्षां कमी कठीण आहे असें अनुभवावरून मी सांगतों.

मराठे आणि अस्पृश्य मुलग्यांपैकीं कांहीं फार चांगले आहेत, कांहीं अत्यंत गलिच्छ आणि वाईट आहेत. त्यांची शिवीगाळी ऐकून आणि त्यांचे हातवारे वगैरे पाहून त्यांना शाळेंतून घालवून द्यावेंसें वाटतें. पण असें करून कसें चालेल ? सौभाग्यवती त्यांना घालवून देण्याबद्दल आग्रह धरते, पण मी ऐकत नाहीं. कारण वाईट लोकांना सुधारणें हाच माझा शाळा काढ-

ण्यांतला हेतु आहे. सौभाग्यवतीही मी मुलींशीं फार बोलतों म्हणून मधून मधून मला बोलते आणि संशयखोरपणा दाखविते. (सगळ्याच बायका संशयखोर असतात का?) तिच्या भलत्या संशयांना अर्थात् मी फारशी भीक घालीत नाहीं, कारण तिचे संशय क्षणभरच टिकतात. (आणि पुष्कळ वेळ टिकले तरी भलत्या संशयांना भलतें महत्त्व देऊन ध्येय कसें सोडतां येईल?)

सौ. ची प्रकृति किंचित् नादुरुस्त आहे. काम फार पडतें आणि खाण्या-पिण्याची आबाळ होते हें एक कारण असलें पाहिजे. मुलांचीहि प्रकृति जेमतेमच आहे. मी आपल्या ध्येयाकरितां कुटुंबाचा होम तर करीत नाहीं? प्रश्न बिकट आहे. असो.

**विनायकराव भोळे**



### [३२] भांडखोरपणाचा प्रश्न?

पुणें,
ता. १५-९-२५

रा. रा. विनायकराव भोळे यांस इंदुमती काळे हिचा नमस्कार वि. वि.

आपलें पत्र पावलें. आपला उपदेश वाचला व शेवटल्या किरकोळ गोष्टीहि वाचल्या. किरकोळ गोष्टींच्या शेवटीं आपण लिहिलें आहे, कीं सौभाग्यवतीनें भलते संशय घेतले तरी मी आपलें ध्येय सोडणार नाहीं. निश्चय उत्तम आहे, पण पतीनें जर का भलते संशय घेतले तर पत्नीनें मात्र आपलें ध्येय सोडावें असें आपलें मत दिसतें. असा फरक कां? प्रश्न जरा भांडखोरपणाचा आहे, पण खरा आणि जिव्हाळ्याचा आहे म्हणून विचारला आहे.

सौ. च्या प्रकृतीकडे दुर्लक्ष करूं नये. सरलावन्संच्यासारखी पत्नी पुन्हां मिळणार नाहीं. मुलांची आई गेली तर त्यांनीं काय करावें? पैसे अधिक

लागतील ते मी पाठवीन. (आजच पाठवितें.) माझें प्रेमाचें धन कमी होत असलें तरी सोन्यारुप्याच्या नाण्यांची तूट नाहीं. पैशांची रास माझ्यापुढें आणून एकदां टाकली म्हणजे काम झालें अशी घरांतली स्थिति आहे. एखादवेळेस मला मोटारींत घालून बाजारांत नेतात आणि कापडचोपड वगैरे श्रीमंती थाटाचें घेऊन देतात, पण पोटांत प्रेमाचा ओलावा नाहीं. दिखाऊ प्रेमाच्या या नाटकांत मीहि आपला पार्ट उत्तम करत्यें! पण क्लबांतून रात्रीं उशीरां येणं आणि पैसा व कपडालत्ता देण्याशिवाय माझ्याशीं संबंध न ठेवणं, जेवतांना उगीच कांहींतरी प्रश्न विचारून खऱ्या प्रेमाचा अभाव लपवूं पाहणं, वगैरे गोष्टींचा अर्थ मला समजतो. पतिप्रेम माझ्या नशिबींच नसावं. एरव्हीं त्यांच्यासारख्या थोर मनाच्या माणसाची वृत्ति अशी झाली नसती. अपत्य-सुखहि नशिबीं नसावं. एरव्हीं छोटीसारखी मुलगी देऊन लगेच ती देवानं परत नेली नसती! बाकी विशेष कांहीं नाहीं. कळावें.

इंदुमती काळे

---

## [ ३३ ] स्त्रिया लतांसारख्या; पुरुष वाघांसारखे

पांचबावडी,
ता. २५–९–२५.

सौ. इन्दुमती काळे यांना विनायकराव भोळे यांचे नमस्कार वि. वि.

आपल्या मागील पत्रांतील प्रश्न बोंचक आणि मार्मिक (व मर्मभेदकहि!) होता. पतीकरितां तुम्हांला ध्येय सोडण्यास सांगतों आणि मी स्वतः पत्नीकरितां आपलें ध्येय सोडण्यास तयार नाहीं, यांत विसंगति दिसते खरी. माझ्याहि ती ध्यानांत आली होती, पण म्हटलं कीं तुमच्या ध्यानांत येणार नाहीं, उगीच कशाला खोलांत शिरा?

हल्लींच्या समाजांत (आणि पुढेंहि कित्येक शतकें) स्त्रियांचें ध्येय संसार करणें हें असणार; म्हणून त्यांनीं पतीला नापसंत असलेली,

अतएव या ध्येयाच्या आड येणारी, गोष्ट टाळावी. पुरुषांचें ध्येय याहून भिन्न आहे, म्हणून त्यांनीं पत्नीच्या इच्छेला जरा बाजूला ठेवलें तरी हरकत नाहीं, असें माझें थोडक्यांत उत्तर आहे. स्त्रिया या लतांप्रमाणेंच आकुंचित क्षेत्रांतच राहण्यांत आनंद मानणाऱ्या असतात. पुरुष हे वाघांप्रमाणें गुहेबाहेर जाऊन पराक्रम करण्यांत आनंद मानतात. लतांना अडचणींना तोंड द्यावेंसें वाटत नाहीं, तर त्या अडचणींना वळसा घालून कोठून तरी जीवनरस घेऊन टवटवीत राहतात, फुलाफळांनीं आपले अंक सुशोभित करतात आणि इतरांना या फुलांफळांनीं आनंद देतात. वाघांना सिंह-हत्ती पाहिले म्हणजे चेव येतो आणि मग ते मादीची किंवा पिलांची पर्वा न करतां शत्रूच्या अंगावर तुटून पडतात आणि मरतात किंवा मारतात. सामान्यतः स्त्रियांना सुंदर कौटुंबिक संसार पाहिजे असतो; पुरुषांना कौटुंबिक संसारांतल्यापेक्षां उच्चतर पराक्रम हवा असतो. या नियमाला अपवाद आहेत, पण सामान्यतः हा नियम बरोबर आहे.

तुम्ही 'कलाप्रेम' 'कलाप्रेम' म्हणून कितीहि म्हटलंत तरी भाऊरावांचें प्रेम तुम्हांला खरोखर पाहिजे आहे; असें नसतें तर भाऊरावांच्या वागणुकीबद्दल तुम्ही तक्रारच केली नसती! तसेंच तुम्हांला छोटी गेली म्हणून फार वाईट वाटत आहे. तुम्हांला मुलांची खरी भूक आहे. माझ्याविषयीं म्हणाल तर मला माझी सौभाग्यवती आणि माझीं मुलें कितीहि प्रिय असलीं तरी समाजकारणांतील आणि राजकारणांतील संकटांना धैर्यानें तोंड देण्यांत मला खरें पौरुष आहे असें वाटतें. तुमचे व माझे प्रकृति-धर्म वेगवेगळे असल्यामुळें, तुमचें ध्येय निराळ्या प्रकारचें असणार आणि माझें निराळें असणार. अर्थात् कर्तव्येंहि भिन्न होणार. तुमच्या खोंचदार प्रश्नाचें हें असें उत्तर आहे. ( बाकी हे प्रश्न खरोखर सामान्य तत्त्वाच्या दृष्टीनें सोडविण्याचा प्रयत्न करण्यांत विशेष अर्थ नाहीं, व्यक्ति, स्थिति व प्रसंग पाहून व्यवहार-दृष्ट्याच ते सोडविले पाहिजेत. एखाद्यानें लग्न करावें का नाहीं या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. पण अमुक मुलीशीं लग्न करावें का नाहीं हा प्रश्न कठीण असला तरी वरच्या प्रश्नापेक्षां तो सोपा. ज्ञानोत्तर कर्म

का अकर्म हा तात्विक प्रश्न जितका कठीण आहे तितका "अमक्या परिस्थितींत असलेल्या अमक्या अमक्यानें कर्ममार्गानें जावें का नाहीं" हा व्यावहारिक प्रश्न तेवढा कठीण नाहीं.)

पत्नीनें घेतलेल्या संशयाला किती महत्व द्यावें हा प्रश्न सोडून माझ्या-पुढच्या प्रत्यक्ष व्यावहारिक प्रश्नासंबंधीं मी तुम्हांला असें सांगतों कीं माझ्याबद्दलचा तिचा संशय मधून मधूनच डोकावतो आणि माझ्यावरच्या प्रेमाच्या भारानें तो दडपून जातो, आणि म्हणूनच मी तिकडे दुर्लक्ष करतों. खरोखरीच तो प्रबळ झाला तर मला काय करावें हा विचार पडेल. आपल्या पतीचा आपल्याबद्दलचा संशय दृढ व प्रबळ होत चालला आहे, म्हणून आपण हटवादीपणा करूं नये असें माझें म्हणणें. शिवाय बिन्दुमाधवांना सोडणें म्हणजे ध्येय सोडणें कसें? पुण्यास गायनशिक्षक दुसरे थोडे आहेत?

मी सत्याग्रहांत पडेन व लवकरच पुन्हां मला तुरुंगांत जावें लागणार असें लक्षण दिसतें. सर्व मंडळीस तिकडे पाठवावें म्हणतों. पण सौभाग्यवती ही शाळा चालविण्याचें काम व इतर सामाजिक काम अंगावर घ्यावें व माझें काम अंशतः पुढें चालू ठेवावें असें म्हणत आहे. तिची इच्छा प्रबळ दिसल्यास तिचें म्हणणें ऐकेन.

नारायणराव पाठक सातारा जिल्ह्यांत फिरत असतात. सातारा जिल्ह्यां-तील एका देवळांत एक जुना व महत्वाचा शिलालेख कोपऱ्यांत पडला आहे असें त्यांना बिन्दुमाधव म्हस्करांकडून सहजगत्या कळलें म्हणून ते लवकरच तिकडे जाणार आहेत, व त्या शिलालेखाचा ठसा घेणार आहेत असें त्यांच्या पत्रावरून समजतें.

ते पुण्यास अलिकडे आपणांस भेटले होते काय? त्यांची प्रकृति कशी आहे? पत्रांत चांगली आहे म्हणतात, पण विश्वास बसत नाहीं. प्रामाणिक मित्राचेंहि लिहिणें बोलणें कांहीं बाबतींत खोटें असणें संभवनीय आहे.

काशी ढवळे ही साखरप्याहून पुण्यास आली आहे म्हणतात. क्षयाची भावना असून दवांतलें औषध घेत आहे असें ऐकतों. तिला भेटून यावें. औषधपाण्याकरितां द्रव्याची मदत तिला पाहिजे असल्यास कोणालाहि अवघड वाटणार नाहीं अशा रीतीनें मदत करावी.

**विनायक भोळे**

---

**[ ३४ ] जखीण-खिंडींत**

पांचबावडी,
ता. २-४-२६.

प्रियमित्र भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

पाटघर येथें नारायणराव पाठक यांच्या संशोधनाच्या कामानिमित्त आठ दिवस राहून ते आणि मी पांचबावडीला चालून येत असतां "जखीण खिंडी"शीं रात्र झाली. ही खिंड म्हणजे दरोडेखोरांचा अड्डा होय अशी प्रसिद्धि आहे. रस्ता अरुंद, दाट झाडी, उंच कडे, डोंगरांत लपण्यास सोईच्या अशा पुष्कळ जागा, यांमुळें ही खिंड प्रवाश्यांना मोठी भीतिदायक वाटत होती आणि तशी ती होतीहि. पण अलीकडे रस्ता मोठा करून आणि आजूबाजूचीं झाडें कापून, आणि दोनही बाजूंस चौक्या बसवून सरकारनें थोडीबहुत सुरक्षितता आणली आहे. चांदणी रात्र असल्यामुळें आम्हीं दोघे न डगमगतां खिंडींतून चालूं लागलों. वाटेंत एक बैलगाडी लागली, तेव्हां सोबत मिळाली म्हणून आनंद झाला. गाडीवानानें आम्हांला गाडींत बसण्यास सांगितलें, आम्हीं थोडेसे आढेवेढे घेऊन बसलों. थोड्या वेळानें दोन बाया अर्धवट धांवत धांवत आल्या आणि "दादा, आम्हांला सोबत करा" असें आम्हांला विनवूं लागल्या. "त्यांना गाडींत घे, आम्ही चालतों," असें आम्ही गाडीवानाला म्हटलें; पण त्यांना तो गाडींत घेण्यास तयार नव्हता. त्याला पैसे देऊं केले तरी ऐकेना. तेव्हां आम्ही दोघे खालीं उतरलों आणि त्या बायांबरोबर चालूं लागलों. वाटेंत त्या बायांची कोण, कोठल्या म्हणून सहज चौकशी करूं लागलों,

तेव्हां त्या बायांच्या बोलण्याचालण्यावरून आणि हावभावांवरून त्या चांगल्या चालीच्या नसाव्यात अशी शंका येऊं लागली. पण "स्त्री-दाक्षिण्य" म्हणून हें सगळें मनांत ठेवून आम्ही त्यांच्याबरोबर चालूं लागलों. खिंडींत एका वळणाच्या ठिकाणीं उंच कड्यामुळें अंधार पडला होता. तेथें गाडी-वानानें गाडी थांबवली आणि शीळ घातली. कशाकरितां शीळ घातली हें आम्हांला समजेना. आम्ही भ्यायलेले पाहून त्या बाया एकीकडे तोंड करून चोरून हंसत असाव्यात अशी मला शंका आली; शंका येण्याचें कारण असें कीं जोरानें हंसूं येऊं लागलें असतां तें पुरतें न दाबतां आल्यामुळें जो विशिष्ट आवाज होतो तसा आवाज मला ऐकूं आला आणि त्यांनीं तोंड मुद्दाम फिरविलें हें मला त्यावेळच्या काळोखांतहि दिसलें. तथापि विशेष स्पष्टतेनें कांहीं दिसत नसल्यामुळें मी आपली शंका मनांतच ठेविली. कशामुळें तरी बावरून जाऊन त्या मोठ्यानें रडूं लागल्या तेव्हां हा काय प्रकार आहे याचा आम्ही विचार करीत आहोंत तोंच खिंडींतल्या एका मोठ्या शिळेच्या आड लपलेले चारपांच दरोडेखोर हातांत तलवारी घेऊन आले आणि आम्हां दोघांना त्यांनीं वेढा घातला. त्या दोन बाया आणि तो गाडीवान यांचें आणि दरोडेखोरांचें संगनमत आहे असें आम्हीं लागलेंच ओळखलें. दरोडेखोरांनीं आमच्या बायकांचा तुम्ही हात धरलात वगैरे घाणेरडे आरोप आमच्यावर करून "आतां पोलिसांकडे तुम्हांला नेतों, हा गाडीवान आणि आम्ही पांचजण साक्षीदार आहोंत, तुमची आतां नाचक्की करतों" वगैरे धाक घातला आणि "आतां असेल तें सगळें द्या, आणि घरीं गेल्यावर ५०० रुपये हा गाडीवान येईल त्याच्या स्वाधीन करा," वगैरे वगैरे गोष्टी ते बोलूं लागले. न ऐकल्यास तोंडाला डांबर फांसून पोलिसांकडे नेऊं आणि गांवांतून धिंड काढूं असेंहि ते म्हणाले. आम्ही मोठ्या पंचायतींत पडलों आणि काय करावें हें सुचेना. बोलतां बोलतां मी पांचबावडीचा विनायकराव वैद्यबुवा असें म्हटलें. तेव्हां त्यांतला एक दरोडेखोर "आं, तुम्ही विनायकराव वैद्यबुवा. पाहूं जरा चेहरा" असें म्हणाला आणि काडी पेटवून त्यानें चेहरा न्याहाळला.

मौज अशी कीं, लगलाच तो आमचा वाली झाला! "माझ्या पोरीला या बामणानें दोन महिने मोफत औषध देऊन वाचवलं आहे, याला सोडा" असें तो म्हणाला आणि लगेच सगळें गाडें पालटून दरोडेखोरांनींच आम्हांला खिंडींतून बाहेर पडेतोंपर्यंत सोबत केली!

घरीं पोंचल्यावर सरलेला ही हकीकत सांगितली तेव्हां तिनें रात्रीं अपरात्रीं "जखीण खिंडींतून" येण्याचा प्रयत्न केल्याबद्दल दोष दिला आणि पुष्कळ तोंडसुख घेतलें आणि आम्हीं तें तिला निमूटपणें घेऊं दिलें.

दुसऱ्या दिवशीं गांवांतल्या मंडळींनाहि ही हकीकत सांगितली. त्यांना मोठी मौज वाटली!

**विनायक भोळे**

---

पांचबावडी,

ता. १३-४-२६.

**[ ३५ ] धर्माचे अभिमानी !**

महात्मा गांधी यांस,

विनयपूर्वक साष्टांग नमस्कार वि. वि. आम्ही सही करीत नाहीं, पण आमच्या पांचबावडी गांवांत कॉंग्रेसचे म्हणून काम करणारे विनायकराव भोळे हे मोठे धर्मबुडवे आहेत आणि त्यांनीं स्त्रियांवरहि अत्याचार करण्याचें ठेविलें नाहीं ही गोष्ट आपले नजरेस आणणें आमचें कर्तव्य आहे म्हणून हें निनांवी पत्र लिहीत आहों. त्यांच्या समाजसुधारणा (?) सनातनी धर्माचीं पाळेंमुळें खणून काढीत आहेत. मुद्दाम मनुष्य पाठवून चौकशी करवावी. आम्ही गांवांतले सनातनी धर्माचे परंपरागत संरक्षक आहोंत म्हणून हें कटु कर्तव्य करीत आहोंत. कळावें.

आपले

सनातनी धर्माचे अभिमानी

**अ आ इ ई**

---

## ज्ञानप्रकाश.

**[ ३६ ] पांचबावडीचें पत्र**

( आमच्या एका बातमीदाराकडून. )

पांचबावडी,
ता. २४–४–२६.

### स्त्रियांवर अत्याचार केल्याचा आरोप.

येथें " साधेभोळे " म्हणून प्रसिद्ध असलेले समाजांतील एक " विशिष्ट नायक " आणि त्यांचे मित्र यांनीं तेथून जवळच असलेल्या " जखीण खिंडींत " दोन ब्राह्मणेतर तरुण स्त्रियांवर रात्रीं अत्याचार करण्याचा प्रयत्न केला अशी अफवा आहे. ती कितपत खरीखोटी आहे हें सांगतां येत नाहीं म्हणून नांवें स्पष्टपणें दिलेलीं नाहींत. स्त्रियांवर अत्याचाराचा प्रयत्न करीत असतां त्या स्त्रियांची घरची मंडळी धांवत आली आणि त्यांना सोडवून वरील संभावित (?) समाजसुधारकांना त्यांनीं चोप दिला आणि तोंडाला डांबर फासून सकाळीं गांवांत सोडून दिलें असें म्हणतात. हें कितपत खरें आहे हें नक्की सांगवत नाहीं. एवढें मात्र खरें आहे कीं, हे दोघे गृहस्थ आठ दिवस गांवांत दिसत नव्हते. अशी बातमी आहे कीं तोंडाला फासलेलें डांबर साबणानें वगैरे निघण्यासारखें नाहीं, खरखरीत पदार्थानें घासूनही पुरतेंसें निघत नाहीं, म्हणून मागें मुंबईस राणीच्या पुतळ्याला लावलेलें डांबर काढून प्रसिद्धीस आलेल्या गज्जरांच्या लॅबोरेटरींतून त्यांच्या कंपनीला माहीत असलेलें डांबर काढण्याचें मिश्रण आणण्याकरितां येथून एक मनुष्य मुंबईस गेला आहे. नक्की बातमी कळल्यावर खुलासेवार हकीकत कळविण्यांत येईल. असे समाजसुधारक (?) महात्मा गांधींना किंवा लोकांना कसे खपतात ?

समाज–सुधारणा असल्या लोकांच्या हातीं गेल्यास " **विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरम्** " या न्यायानें ' विनायका ' च्या ऐवजीं आपणांस वानरच दिसावयाचा !

पुणें.

[ ३७ ] संशयनिरास ता. २५-४-२६.

प्रिय भगिनी सरला हीस भाऊ काळे याचे आशीर्वाद विशेष.

पुणें येथील लष्करांतील एका सामाजिक क्लबांतले आम्ही सभासद असल्यामुळें सी. आय. डी. मधील ई. आय. क्लॅरेन्स या नांवाचा एक सज्जन ऑफिसर आणि मी सामाजिक बाबतींत दोस्त आहोंत. त्याचे जवळ बोलतां बोलतां विनायकरावांच्या तोंडाला काजळ फासण्याबद्दलची जी अफवा उठली आहे आणि जिनें जिकडेतिकडे जणूं कांहीं आग लावून दिली आहे, त्यासंबंधानें मी गोष्ट काढली व खरा प्रकार काय आहे, याबद्दल चौकशी करून तो मला सांगतां येईल का म्हणून त्याला विचारलें. "खात्याच्या नियमाप्रमाणें सांगतां येणें कठीण आहे; पण चौकशी करून मग काय तें निश्चित सांगतों" असें त्यानें उत्तर दिलें. त्याचें मला एक खाजगी पत्र आलें आहे, त्याची नक्कल खालीं देत आहें, त्यावरून काय समजावयाचें तें तूं समजशीलच.

*<u>Private</u>

CAMP, POONA,
24-4-26.

Dear Mr. Bhausaheb Kale,

I am not as you write and as many people seem to think an " Inspector of Criminal "*Investigation*" but of Criminal "*Intelligence*" ( though I believe I have not the intelligence of a criminal ).

Although I am precluded by departmental rules from divulging any information about the activities of political and other workers, I think I may be allowed to take advantage of the exceptions allowed, if I merely state that

your relative was, (so far as my information goes,) a victim of three or four notorious women who entrap men, and leave them in the hands of a gang of dacoits who force them to part with their money on pain of their faces being tarred in case of refusal.

You will perhaps hear more of these notorious women if you care to read the proceedings of courts.*

(Copy.)

Yours truly,
(Sd.) E. I. CLARENCE.

या पत्रावरून तुझ्या ध्यानांत येईल कीं, विनायकराव शुद्ध असून त्यांचेवर दुष्टांनीं कुभांड रचलेलें आहे.

त्यांचेबद्दल भलताच संशय तूं घेत असशील असें वाटत नाहीं, पण तुझा स्वभाव असल्या बाबतींत फार संशयखोर आहे हें मला ठाऊक आहे. संशय घेत नसल्यास उत्तमच, पण घेत असल्यास इतःपर तरी सज्जनाला छळण्याचें पाप पदरीं घेऊं नये. धारोपंत नागे, कृष्णंभट फुरशे वगैरे दुष्ट लोक छळण्यास टपलेलेच आहेत व ईश्वरहि टपलेला दिसतो, पण माझ्या सरलेनें तरी या फंदांत पडूं नये अशी इच्छा करणारा तिचा भाऊ,

भाऊ काळे

*"कांहीं लुच्चा बाया दरोडेखोरांच्या साथीदार असून त्या भोळ्याबापड्या लोकांना या दरोडेखोरांच्या जाळ्यांत आणून सोडतात अशा प्रकारची आम्हांस बातमी लागली आहे व आपले नातलग निर्दोषी असावेत असा माझा समज आहे," असा वरील पत्राचा आशय आहे.

पांचबावडी,
ता. २७-४-२६.

## [ ३८ ] पत्नीचा पाठिंबा

मित्रवर्य भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

सरलेला आपण लिहिलेल्या पत्रावरून तीहि आमच्याबद्दल संशय घेते असा आपला ग्रह झालेला दिसतो तो साफ चुकीचा आहे. या प्रसंगीं तर, ती संशयखोर आहे, पण माझ्यावर तिची निःसीम भक्ति आहे. इतकी कीं मी 'या भक्तीला पात्र नाहीं या जाणिवेनें माझी मलाच लाज वाटते. तिचा आम्हांला जेवढा धीर आहे तेवढा कोणाचाहि आणि कशाचाहि नाहीं. सगळें जग ज्या वेळेस पतीला सोडतें त्या वेळेस सात्विक पत्नी त्याला अधिक चिकटते आणि त्याला सांवरून धरते. कळावें.

आपला
**विनायक भोळे**

---

माधवाश्रम, मुंबई,
२४-११-२६.

## [ ३९ ] मनांत खळबळ, पत्रांत बडबड

मित्रवर्य रा. रा. विनायकराव भोळे यांस नारायण पाठक मुक्काम मुंबई याचे साष्टांग प्रणिपात. आज ता. २४-११-२६ तागायत येथील कुशल आहे.

पत्र लिहिण्यास कारण कीं इन्दुवहिनी व सरलावहिनी तसेंच छोटू, छोटी आणि चिंगी हीं मुंबई पाहण्यास येथें आलीं असोन त्यांच्या बरोबर मी दोन तीन ठिकाणीं गेलों होतों. मला सविस्तर पत्रें लिहिण्याची हौस आहे म्हणून येथील खुशालीचें वगैरे आपणांस पत्र लिहिण्याचें काम त्यांनीं मजकडे सोंपविलें आहे. ज्याला काम करण्याची हौस असते

त्याच्यावरच मग सगळ्या कामाचा बोजा पडूं लागतो हा दुनियेंतला न्यायच आहे. " कष्टाळू उंटाला वाळवंटांतील दौड आणि लबाड मांजराला घरांतील दूध " अशा अर्थाची आरबी भाषेंत एक म्हणच आहे !

आम्ही चार दिवसांपूर्वी राणीचा बाग पाहण्यास गेलों होतों. मंडळी जेथें उतरली आहेत तेथील शेजारच्या कांहीं बायका, मुलगे, मुली व लहान अर्भकेंहि आमच्या बरोबर होतीं. इन्दुवहिनी मात्र नव्हत्या; कारण त्यांची कपड्यांची जी ट्रंक होती तिची किल्ली कोठें हरवली होती आणि चांगलें पातळ आणि त्याच्या रंगाला जुळणारा ब्लाऊज असल्याशिवाय त्या घराबाहेर पडण्यास तयार नव्हत्या ! दुसऱ्या एका पेटींत कांहीं पातळें ( माझ्या दृष्टीनें चांगलीं अशीं ) होतीं; पण तीं त्यांच्या कलात्मक अभिरुचीला पटण्याजोगीं नव्हतीं. आपण सुंदर दिसावें या हौशीपुढें सुंदर स्थळें पाहण्याची मातब्बरी काय ? त्यांचे यजमान आपल्या हौशी पत्नीचें कौतुक करण्याकरितां ( किंवा, खरें बोलावयाचें म्हणजे कौतुक करण्यांत आपण कसूर करत नाहीं असें दाखविण्याकरितां ) आले आहेत. पण पत्नी जात नाहीं असें पाहून कांहीं तरी कामाचें त्यांनीं निमित्त केलें आणि ते फोर्टमधील एका इमारती मंडळाकडे निघून गेले. अर्थात् सगळीं चिलींपिलीं आणि बायकांचें लटांबर संभाळण्याचें काम इतिहासाभ्यास-जड व व्यवहार-शून्य नारायण पाठकावर येऊन पडलें. इन्दुवहिनींनीं घरीं बसून छोटीला संभाळण्याचें काम आपल्याकडे घेण्याचा मनापासून प्रयत्न केला (छोटीवर त्यांचें खरोखरच आपल्या मुलीप्रमाणेंच प्रेम दिसलें ) पण सरलावहिनींना ( मला वाटतें तुमच्या संगतीनें ) मुलांची इतकी हौस आहे कीं एक कडेवर बसणारी छोटी आणि हाताचें बोट धरणारा छोटू यांना सांभाळून नेण्याचें त्यांना ओझें वाटलें नाहीं किंवा त्यांत लाजहि वाटली नाहीं. त्यांना एका लहान गोष्टीची मात्र लाज वाटली. ती ही कीं आपण तऱ्हेदार पोषाख करावा म्हणून त्यांनीं आपल्याकडून मोठ्या कांठाच्या चोळीवर पांढरें रेशमी जाकीट चढविलें होतें आणि त्या एक जणूं कांहीं एखाद्या लग्न-समारंभाला चाललों आहोंत अशा

भावनेनें एक कोरें लुगडें नेसल्या होत्या. मुंबईंतल्या बायकांनीं त्यांची याबद्दल बायकी कुचक्या पद्धतीनें थोडीबहुत टिंगल केली ती त्यांना जराशी लागली. गरीब बिचाऱ्या खेड्यांत राहणाऱ्या बायका ! त्यांना जी आजची तऱ्हा वाटते ती शहरांत कालची असते हें समजत नाहीं आणि मग त्यांची जी फजिती होते ती माझ्यासारख्या निरीक्षकाला क्षणभर दुःख देते ( पण त्यांत क्षणभर मौजहि असते ! ). सरलावहिनींना दुमजली ट्रॅम पाहण्याची इच्छा होती आणि आमच्या नशिबानें दुमजली ट्रॅम मिळालीहि. पण त्यांत फार गर्दी होती. ट्रॅममध्यें चढण्याच्या अगोदरच मी छोटूला आपल्या हातांत धरलें होतें, आणि सगळ्या बायका आणि सगळीं मुलें पुरुषांच्याच दरवाजानें चढल्यावर मी छोटूसह ट्रॅममध्यें घुसलों. ट्रॅमकंडक्टरनें " उप्पर जाव, जागा खाली आहे " असें जागच्याजागीं घुटमळणाऱ्या बायकांना सांगितल्यावर अघाडीवर असलेल्या मुंबईच्या बायका वर चढल्या, पण आपल्या सरलावहिनींना त्या धांदलींत " जागा खालीं आहे " असें वाटून त्या वर न चढतां तळमजल्याकडे वळल्या. ट्रामचा कंडक्टर " उप्पर जागा खाली आहे " असें जेव्हां त्यांना सांगूं लागला तेव्हां त्यांना जागा उप्पर आहे का खालीं आहे हें समजेना आणि त्या भांबावून गेल्या आणि " नारायण " त्यांच्या पिछाडीला उभा राहून त्यांची पाठराखण न करता तर त्यांच्या फजितीला पारावारच राहिला नसता !

राणीच्या बागेंत सगळीकडे आम्ही हिंडलों. लहान मुलांना आणि मुलींना फारच आनंद झाला. इतर मुलांना आणि चिंगीसह इतर मुलींना प्रत्येकीं दोन दोन आणे देऊन उंटावर बसवून फिरवून आणल्यावर आमच्या छोटूरावांनाहि उंटावर बसण्याची इच्छा झाली, पण भीतीमुळें त्यांना ती दाबून ठेवावी लागून उंटावरचा शहाणपणा करण्याचें काम आमच्यापैकीं कांहीं बोलघेवड्या बायकांवरच सोंपवावें लागलें !

राणीच्या बागेंत दोनदां गेलों होतों. तेथील मौजा आतां लिहीत नाहीं, पुढील पत्रांत कदाचित् लिहीन. आतां न लिहिण्याचें कारण एवढेंच

कीं काशी ढवळे मला राणीच्या बागेंत आम्ही गेलों असतां भेटली, आणि तिच्या भेटीमुळें माझ्या मनाची जी चलबिचल सुरू झाली तिनें आतां या क्षणीं पुनः उचल केल्यामुळें माझें दिल पत्र लिहिण्याचें काम चालू ठेवण्याइतकें खंबीर नाहीं, म्हणून 'येथेंच एकदम' सबूर करतों.

आपला,
**नारायण पाठक**

---

## [४०] छोटूचें छोटें पत्र

मुंबई
शनिवार तारिख
सववीस नोवेंबर १९ शे
सववीस

वडिलांना नमसकार. आमही राणीचा बाग पाहिला. सगळी मंडळी खुशाल आहेत. नारायणराव पाठक आमहाला सगळे दाखवितात. टरमगाडी पाहिली. एक दुमजली होती. काशीताई ढवळे येथे आज आली होती तिनें कोकणातील चांगले काजूगर दिले. आईनें हें पतर लिहिणास सांगितले. चुका आहेत का आईने आपली खुशाली कळवावी असे लिही असे सांगितले आहे. तुमचा लाडका छोटू.

---

## [४१] "मन कमकुवत करणाऱ्या मुलाखती"

मित्रवर्य रा. रा. विनायकराव भोळे यांस नारायण पाठक, मु॥ मुंबई याचे नमस्कार. येथील कुशल जाणोन आपलें कुशल विदित करावें.

वरील "कुशल" वाक्य यांत्रिक तऱ्हेनें लिहिलें खरें. पण "कुशल" नाहीं हें जाणावें. काशी ढवळे हिची भेट हें अर्थात् कारण आहे. तिनें क्षयावरचें दह्यांतलें आयुर्वेदिक औषध घेतल्यावर तिला बरें वाटूं लागलें, तथापि मुंबईच्या तज्ज्ञ डॉक्टरांना दाखवावें म्हणून तिच्या आईनें तिला

येथें आणलें आहे. डॉक्टरनें प्लीहा, यकृत्, हृदय, रक्त, वगैरे सगळें तपासून पाहिलें आणि रोग मानसिक आहे, सर्व इंद्रियें साफ आहेत, त्यांत कांहीं एक विकृति नाहीं, म्हणून सांगितलें आणि तिला रम्य स्थळें वगैरे दाखवून तिचें मन रिझवावें, एकटीला स्वतःशीं विचार करीत कुढत बसण्यास सवड देऊं नये, असा वैद्यकीय सल्ला दिला. त्याला अनुसरूनच तिच्या आईनें तिला त्या दिवशीं राणीच्या बागेंत आणलें होतें. आमची दृष्टादृष्ट झाल्यावर उभयतांस जरा चमत्कारिक झालें, पण मीच धीर धरून तिच्या आईशीं आणि तिच्याशीं बोलूं लागलों. त्या दिवशीं इंदुवहिनींची ट्रंकेची किल्ली सांपडली होती म्हणून त्या आल्या होत्या. त्यांनीं आणि सरलावहिनींनीं काशीला व तिच्या आईला घरोब्यानें प्रश्न विचारून आपल्या लवाजम्यांत सामील करून घेतलें. आम्हीं रेंगाळत आहोंत असें पाहून कांहीं वेळानें त्यांनीं योग्य संधि साधून आम्हां उभयतांस चाणाक्षपणें मागें रेंगाळूं दिलें आणि मग त्या झटकन् पुढें सरकल्या. एकान्त मिळाल्यावर मी "आतां खरंच बरं वाटतं आहे ना? का उगीच कांहीं तरी मघाशीं सांगितलं?" असें तिला विचारलें. "आपण बरे असलेत म्हणजे झालं, माझं बरं काय नि वाईट काय?" अशा प्रकारचीं प्रथम तामसी उत्तरें दिल्यानंतर माझी सात्विक व (तुझ्याशीं सांगण्यास, कबूल करण्यास हरकत नाहीं) प्रेमपूर्ण उत्सुकता पाहून तिची कळी खुलली आणि ती मग मन मोकळें करून सात्विकपणें बोलूं लागली. ती जरा रंगानें फिक्कट झाली आहे, पण डोळ्यांतलें तेज त्यामुळें अधिकच खुलतें. काय असेल तें असो. त्यावेळीं ती मला फारच सुंदर दिसली. चंद्रिका फिक्कट नसते का? फिक्कट पिवळ्या रंगाचें गुलाबाचें फूल गडद पिवळ्या रंगाच्या फुलापेक्षां अधिक सुंदर नसतें काय? ("इति-ह-आस" हें सांगण्याचें सोडून माझ्यासारख्या गद्यात्म्यानें काव्य करूं लागण्यांत अर्थ नाहीं, म्हणून तो मार्ग सोडतों.) बोलतां बोलतां ती मला म्हणाली, "आईबापांनीं मला अलिकडे कुढत बसण्याचें सोडून 'गीतारहस्य' वाचण्यास सांगितलें आहे. तें जाडं पुस्तक मला तर कळत नाहीं. ज्ञानोत्तर कर्म, आणि 'सांख्य' आणि 'द्विविधा

निष्ठा ' वगैरे मला कांहीं समजत नाहीं, पण मनांत असा प्रश्न येतो कीं ज्ञान हें अनंत आहे, तें पूर्ण होणार कसें? आणि पूर्ण झालें तरी मनुष्याचें केवळ ज्ञानानें समाधान होईल का ? " मी या प्रश्नांनीं गडबडलों, कारण मी इतिहासाचा जसजसा अभ्यास करीत आहें तसतसा त्यांतील गोष्टींच्या खरेपणाबद्दल आणि सिद्धांताच्या सयुक्तिकतेबद्दल अधिकाधिक साशंक होऊं लागलों आहें. आणि केवळ ज्ञानानें मनुष्याचें समाधान होणें शक्य नाहीं असें मला अलीकडे वाटूं लागलें आहे, हें तुला ठाऊकच आहे. तरी मनाची गडबड कशीबशी लपवून मी उत्तर दिलें. " ज्ञान मिळविण्याच्या मार्गांत असणें यांत खरें सुख आहे, ज्ञानाचा अन्त पाहिलाच पाहिजे असें नाहीं."

" मी वाद करूं इच्छीत नाहीं, आणि मनहि वळवूं इच्छीत नाहीं, म्हणून हें बोलणें इथेंच सोडूं या " असें ती म्हणाली; तेव्हां " माझ्याशीं बोलणें आवडत नाहीं असं दिसतंय् " असें मी म्हटलें. तिनें उत्तर दिलें, " बोलणं आवडतें, पण ' मन कमकुवत करणाऱ्या मुलाखती आणि मुकाबले मला नकोत ' असं विनायकरावांच्या घरीं निक्षून सांगितल्यानंतर मी कशाला वाद घालीत बसूं?" मागील प्रसंगाची आणि त्यावेळीं वापरलेल्या शब्दांची आठवण करून दिल्यामुळें मी अधिकच गांगरलों. पण तिनेंच समयसूचकतेनें दुसरा विषय काढला आणि मग आमचें चारपांच मिनिटें फार आल्हाद-कारक संभाषण झालें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अखेर माझें मन मृदु झालें! आजन्म अविवाहित राहणार या माझ्या प्रतिज्ञेचा मी भंग करणार इतक्यांत सुदैवानें स्वाभिमान जागृत झाला आणि मी भानावर येऊन मोह आवरला. इतक्या अवधींत मंडळी बरीच पुढें गेली होती, तेव्हां अधिक वेळ बोलणें गैर वाटून आम्हीं पुनः मंडळीच्या घोळक्यांत सामील झालों. शरीर तेथें होतें, पण आमचीं मनें कोठें होतीं आणि त्यांत काय चाललें होतें, हें ईश्वरासच ठाऊक!

घराकडे परत जातांना ट्रॅममध्यें तिच्या आईजवळ मी बसलों होतों. " उद्यां आम्ही मंडळी प्रिन्स ऑफ् वेल्स म्युझियम पाहण्यास जाणार

आहोंत, तुम्हांला यावयाचं असल्यास मी तुमच्या घरीं तुम्हांला घ्यावयास येईन" असं मी सहज म्हटलं, तेव्हां त्या माउलीला फारच आनंद झाल्यासारखा दिसला. वचन दिल्याप्रमाणें मी त्यांच्या उतरत्या घरीं गेलों. तेथें माझा जावयासारखाच त्या माऊलीनें आदरसत्कार केला. मुलीला सुख व्हावें म्हणून माऊलीची ही सारी खटपट. आईचें हृदय हें असं आहे. तिनें मला दहींपोहे, चहा वगैरे देतांना मनांतला हेतु परोपरीनें कसा सूचित केला हें हास्योत्पादक रीतीनें सांगतां येईल, पण विषयाच्या गांभीर्यपूर्ण औदासिन्यामुळें तसला प्रयत्न करण्यास लेखणी धजावत नाहीं. मला काशीशीं लग्न करावयाचें असतें तर मात्र मी खरोखरच रसपूर्णतेनें वर्णन केलें असतें. पण सध्यां दिग्दर्शनच पुरे.

प्रिन्स ऑफ् वेल्स म्युझियम पाहण्यास जातांना बायकांनीं ट्रॅमजवळ गोंधळ केलाच. कांहीं ट्रॅमवर चढूं शकल्या, कांहीं मागें राहिल्या! पण मागें राहिलेल्यांपैकीं एकीला अंगावर येणाऱ्या मोटारच्या भीतीनें एकदम घेरी आली व ती मोटारखालीं सांपडून मरणार होती, पण मोटर-ड्रायव्हरच्या कसबानें वांचली. मंडळीची ताटातूट झाल्यामुळें निरनिराळ्या ट्रॅमांमध्यें बसून आम्हीं म्युझियमपर्यंत गेलों व तेथें उतरून पुनः एक झालों. म्युझियममध्यें आंत शिरल्यावर प्रथम कांहीं नग्नप्राय स्त्रियांचे पुतळे दिसले तेव्हां दहा एक वर्षांच्या एका मुलानें मला "असे कां हे पुतळे केले?" असा प्रश्न केला. बायकांनीं दृष्टि फिरवली आणि प्रश्न ऐकला न ऐकला असें केलें. मीहि तसेंच केलें. मी त्या बायकांना तेथील हरतऱ्हेचे प्राणी, पक्षी, चित्रें, शिलालेख, ताम्रपट, इतिहासपूर्व दगडांचीं हत्यारें, एका लिपीपासून स्थित्यन्तरें होत होत हल्लींची लिपी कशी उत्पन्न झाली याचा तक्ता, वगैरे सर्व दाखविले व शाळामास्तराप्रमाणें त्यांचें महत्त्व समजावून देण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न पाहून कांहीं बायकांनीं गमत्या बडबड्या मास्तरांत माझी गणना केली आणि कांहींनीं माझ्या विविध माहितीची तारीफ केली! लहान मुलगे जे होते ते मात्र मधून मधून मला प्रश्न विचारीत

आणि कित्येक वेळां मार्मिक प्रश्नांच्या द्वारें माझ्या अज्ञानाची मला जाणीव करून देत !

काशीशीं एकीकडे बोलण्याची संधि मला दोनतीनदां मिळाली. (किंवा खरें सांगावयाचें म्हणजे "जाणत्या" बायकांनीं मला संधि आणून दिली.) संधि मिळाल्यावर माझ्या मनाची स्थिती प्रांजलपणें मी तिला सांगितली आणि म्हटलें, "माझ्या आयुष्याची आगगाडी आतां ज्ञानमार्गाच्या रुळावर आहे, ती आतां दुसऱ्या रुळांवर नेणें शक्य नाहीं." "कां शक्य नाहीं ?" ती म्हणाली. आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ तिनें पुढील दाखला दिला. "आगगाडी एका रुळावरून दुसऱ्या रुळावर नेलेली कितीदां तरी आपण स्टेशनवर पाहतों. आणि दुसऱ्या रुळावर नेली म्हणजे दिशा सपशेल बदलली असेंहि होत नाहीं."

"तें सगळं खरं, पण......"

"मन कमकुवत करणाऱ्या मुलाखती आणि मुकाबले नकोतच मुळीं, तेव्हां आतां आपण हा विषयच बदलूं या, नाहीं तर आपल्या मंडळींत पुनः जाऊं या" असें अंशतः विनोदानें, अंशतः निराशेनें आणि अंशतः रागानें म्हणून ती खरोखरच तिकडे गेली.

असे हे प्रकार दोनतीनदां झाले. आतां मित्रा, तुला प्रश्न असा कीं मी काय करावें ? हा प्रश्न विचारण्याकरितांच हें पत्र मुख्यत्वेंकरून लिहिलें आहे, तेव्हां म्युझियम पाहण्याच्या वेळच्या आणि नंतर दुसऱ्या ठिकाणीं गेलों तेथल्या हकीकती लिहीत नाहीं. एक मात्र गोष्ट लिहितों. ती ही कीं बिन्दुमाधव म्हस्कर यांना इन्दुवहिनी मुंबईस आल्या हें कसें कळलें कोणास ठाऊक ? ते एक दिवस आमच्या मंडळींत आलेच आणि आपल्या ऐटबाज पोषाखानें, रुबाबदार अंगयष्टीनें, दरबारी चालीरीतीनें, आणि विनोदी गप्पागोष्टी सांगण्यानें तेथील सगळ्या स्त्रियांस आणि मुलांस त्यांनीं मोहित करून टाकलें. इतिहासाभ्यासजड नारायण पाठक त्यांच्या

पुढें इतका फिक्का पडला कीं काशी ढवळे व तिची आई यांना तोंड दाखविण्यास त्याला कांहीं वेळ लाज वाटली ! पण काशीच्या आईनें जेवण्यास बोलावल्यामुळें त्याचा स्वाभिमान कांहीं वेळ तरी जिवन्त राहिला. कोंबड्या आणि त्यांचीं पिलें यांत राजाप्रमाणें मिरविणारा कोंबडा मोरापुढें फिक्का पडला तर त्यांत नवल काय ? आणि त्यांत वाईट तरी काय आहे ? प्रश्न एवढाच आहे कीं तो प्राणी खरा मोर आहे का मोराचीं पिसें लावलेला डोंबकावळा आहे ? थट्टा सोडून गंभीरपणें बोलावयाचें म्हणजे बिन्दुमाधव म्हस्कर हा इन्दुवहिनीला एखाददिवशीं गोत्यांत आणणार असा माझा अंदाज आहे.

कळावें लोभ असावा व **महत्त्वाचा सवाल केला आहे त्याचा सरळ जबाब लवकर** यावा हे विनंति.

**नारायण पाठक**

**ता. क.** येथील अस्पृश्योद्धार मंडळाचे एक चिटणीस गणपतराव हरळे नांवाचे आज मला भेटले. अस्पृश्याची मुलगी मुलीप्रमाणें तूं संभाळली आहेस, हें त्यांना कळलें होतें. ही मुलगी मुंबईस अमक्या अमक्या ठिकाणीं उतरली आहे असें त्यांना पांचबावडीच्या एका इसमाकडून कळलें म्हणून या मुलीला व या मुलीला घरच्याप्रमाणें वागविणाऱ्या मंडळीला कौतुकानें भेटण्याच्या इच्छेनें ते माझ्याकडे आले होते. त्यांची व चिंगीची आणि घरच्या मंडळीची भेट करवून दिली. मुलगी चुणचुणीत आहे हें त्यांनीं कांहीं प्रश्नांच्या उत्तरांवरून ताडलें. तिला मुलीप्रमाणें संभाळण्याबद्दल सरलावहिनींचे त्यांनीं मनःपूर्वक आभार मानले. मनुष्य सज्जन व परोपकारी दिसला.

**नारायण पाठक**

---

## [४२] "कलाविलास" करतां करतां "कलिविलास" व्हावयाचा !

पांचबावडी.

१–१२–२६.

मित्रवर्य नारायणराव पाठक यांस विनायक भोळे याचे साष्टांग नमस्कार वि. वि.

मुंबईहून सौभाग्यवती, छोटू व चिंगी ही मंडळी येथें सुखरूप येऊन पोंचली. सौ॥ ही मुंबईस तूं जी हरतऱ्हेची मदत केलीस तिचा वारंवार उल्लेख करते. किती तरी मजेदार गोष्टी सांगते. त्यांत काशी ढवळे ही नायिका असते ! तूं लग्न न करण्याचें नाकारीत आहेस म्हणून तुला या गोष्टीमध्यें नायकाचें स्थान न मिळतां नायिकेला छळणाऱ्या कलिपात्राचें स्थान मिळतें. चिंगी ही देखील काशी ढवळेबद्दल कांहीं कांहीं बोलत असते. तिला आंतल्या कांहीं गोष्टी सौ. कडून कळल्या असाव्यात.

छोटू तर मुंबईच्या पुष्कळच गोष्टी सांगतो. पण त्याचा अर्थ सुसंगतपणें लावणें हें आधुनिक गूढगुंजनात्मक काव्यांचा अर्थ लावण्यासारखेंच कठीण आहे. त्यानें मेहनत घेऊन लिहिलेल्या पत्राचें इतकें कौतुक (तसेंच विडंबनहि !) होत आहे कीं तें पत्र आमचें सबंद तोंडपाठ झालें आहे !

सारांश आजकाल "मुंबई" शिवाय विषय नाहीं. तुझ्याहि मनांत तोच विषय घोळत असेल, म्हणून त्या विषयाकडे गंभीरपणें वळतों. काशी ढवळे हिच्याशीं लग्न करण्याचा निश्चय करावा असें माझें तरी मत आहे. मनुष्याचा जन्म केवळ शारीरिक सुखाकरितां जसा नाहीं, तसाच तो केवळ बौद्धिक सुखाकरितांहि नाहीं. आणि वस्तुस्थिति अशी मौजेची आहे कीं जो केवळ बौद्धिक सुखाच्याच पाठीमागें लागेल त्याला तेंहि सुख लाभत नाहीं; कारण शरीरधर्माकडे दुर्लक्ष केल्यास बुद्धीमध्यें कांहींना कांहीं तरी विकृति उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं. काव्यांचा आस्वाद घेण्यास किंवा ऐतिहासिक अथवा तात्विक अथवा सामाजिक

प्रश्नांची निर्विकार दृष्टीनें विचार करण्यास मनाची जी एक प्रकारची समता लागते ती अविवाहित स्थितींत राहणें अशक्य नसलें तरी अशक्यप्राय आहे. तुझ्या बाबतींत दुसरा असा एक महत्वाचा मुद्दा आहे कीं तूं काशीला (अविचारी यौवनदशेंत कां होईना) वचन दिलेलें आहेस. आणखी असें कीं तिचें तुझ्यावर फार प्रेम आहे आणि ती तुझ्याशीं एकनिष्ठतेनें वागत आहे. शिवाय ती चांगली सुंदर आहे, सुस्वभावी आहे; तुझ्या ध्येयाच्या आड येणारी नाहीं. आणि सगळ्यांत महत्त्वाचा मुद्दा असा कीं तुझ्या मनांत खरें म्हटलें म्हणजे तिच्याशीं लग्न करावयाचें आहे, आणि माझ्या संमतीच्या पडत्या फळाची आज्ञा तुला पाहिजे आहे! (ही आपली उगीच थट्टा केली. मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं सर्व दृष्टींनीं विचार कर आणि आत्मवंचना करून घेऊं नकोस. ध्येय सोडल्याची, व प्रतिज्ञाभंगाची वगैरे खोटी लाज बाळगूं नको.)

येथील सगळी मंडळी खुशाल आहेत. चिंगीची आई, व तिचे सर्व नातलग वारल्यामुळें तिला आतां आम्हीं घरांतच ठेऊन घेतली आहे हें सौभाग्यवतीकडून मुंबईस कळलें असेलच. अस्पृश्यांच्या हातचें पाणी पीत होतों म्हणून ग्रामस्थांनीं आम्हांला वाळींत टाकून गांवाबाहेरील महारवाड्याजवळ राहण्यास अगोदरच भाग पाडलें होतें. आतां तिला मुलीप्रमाणें घरीं ठेऊन घेतल्यास अधिक काय छळणार आहेत! मुलगी फारच चलाख आहे; तिला शिक्षण देऊन चारपांच वर्षांनीं एखाद्या चांगल्या वराशीं लग्न लावून द्यावें असा बेत आहे. खर्चाविषयीं मी पर्वा करीत नाहीं. माझ्या दोन मुलांचें जसें चालेल तसें हिचेंहि ईश्वरकृपेनें चालेल! मुंबईस मंडळी ज्या घरांत उतरली होती तेथील मंडळीला प्रथम ती अस्पृश्य वर्गांतली आहे हें कळलेंच नाहीं! कळल्यावर त्यांनीं तिला माझ्या मुलांप्रमाणेंच वागविलें ही गोष्ट ऐकून हिंदुस्थानच्या भवितव्याबद्दल आशा वाटते. चाळींतल्या शेजारच्या बायकांमध्यें पुष्कळ कुजबूज चालत होती, पण मुंबईस शेजाऱ्यांच्या कुजबुजीला कोण विचारतो? इंदुवहिनीला ती गबाळी आणि घाणेरडी वाटते, पण तिच्या

कलात्मक दृष्टीला तूंहि गबाळ्या वाटतोसच आणि थोडाबहुत जो घाणेरडेपणा आहे तो कालांतरानें जाईल.

भाऊराव काळे यांचें मन आपल्या पत्नीविषयीं शुद्ध नाहीं; इंदूची चूक आहे, पण तिला ती पटवून देणारा कोण? कलाविलास हें तिचें ध्येय आहे. सांकेतिक नीतीचा सासुरवास तिच्या कला–लालसेला आतां सहन होत नाहीं. अमृत आणि विष हीं जशीं समुद्राच्या पोटीं आलेलीं भावंडें आहेत तशींच "कला" आणि "कलि" हीं मनुष्याच्या ध्येयनिष्ठेचीं अपत्यें आहेत आणि कलेला स्वैरपणें वागूं दिल्यास तिच्या अंगीं कलीचे गुण येण्याचा संभव असतो हें इंदु विसरते. कला–विलास करतां करतां कलि–विलास न होवो म्हणजे झालं! बिन्दुमाधव म्हस्कर मुंबईस आले होते वगैरे गोष्टी सौ. कडून कळल्या. त्यावरून ही भीति वाटूं लागली आहे. दुसरा कोणताच आधार नाहीं.

**विनायक भोळे**

---

## [ ४३ ] आकाशांतून कुऱ्हाड कोसळली

पांचबावडी

३–३–२७.

सौ. इन्दु काळे हीस अनेक आशीर्वाद विशेष.

मला अत्यन्त वाईट बातमी कळवावयाची आहे. ती ही कीं विनायकरावांचीं दोनहि मुलें पटकीनें वारलीं! महारवाड्यांतील विहिरीचें पाणी दूषित होऊन तेथें पटकीचा उपद्रव सुरू झाल्यावर विनायकराव गरिबांकडे आपण होऊन जात व औषध फुकट देत. त्यांचेकडे जाऊन रात्रीच्यारात्री जागून काढीत. निम्मे अधिक रोगी बरेहि केले. पण स्वतःच्या मुलांना वांचवूं शकले नाहींत!

गांवांतले कांहीं लोक इतके दुष्ट आहेत, कीं विनायकरावांसारख्यांना ते महारमांगांप्रमाणें अस्पृश्य मानतात व चांगलें पाणी असलेल्या विहिरीवर

पाणी भरून देत नाहींत. विनायकराव महारवाड्यांतील विहिरीचें पाणी उकळून घेत, पण पाण्याचे बाबतींत मनुष्य जपणार किती ? शेवटीं जें व्हावयाचें तें झालें. स्वच्छ पाणी घेऊं न देऊन बंधुभगिनींना जरीमरी देवीला बळी देणाऱ्या सज्जनांना धर्म राखण्याचें पुण्य लागेल ! सरलेनें आणि विनायक-रावांनीं पोरांना वांचविण्याकरितां जिवापाड मेहनत घेतली. आलोचन जाप्रणें केलीं. पण सर्व व्यर्थ. विनायकरावांना घरांत स्वतःचीं लाडकीं मुलें आजारी होतीं तरी गरीब अस्पृश्य रोग्यांकडचीं बोलावणीं यावयाचीं, आणि तेहि मन घट्ट करून जाऊन लगबगीनें परत यावयाचे. छोटू अगोदर वारला आणि दोन तासांनीं छोटी गेली. रात्रभर घरांत काय शोकप्रकार झाला असेल याचें मी कसें वर्णन करूं ? बिचारीं दोघेंजणं मुळुमुळूं रडत आणि एकमेकांचें समाधान करूं पहात. चिंगी एका कोंपऱ्यांत रडत बसली. मी कांहींच बोलत नव्हतों. मला कसें समाधान करावें हेंच समजेना. सरलेनें "भाऊ, भाऊ, कायरे आम्ही पाप केलं होतं म्हणून देवानं आमच्यावर हा गहजब केला" असें म्हणून माझ्या मांडीवर डोकें ठेवलें. मी अश्रु ढाळण्याशिवाय आणि तिच्या पाठीवरून हात फिरवण्याशिवाय कांहीं एक करूं शकलों नाहीं. "छोटू आणि छोटी गेली, पण चिंगी आपली मुलगीच आहे; आणि शाळेंतलीं मुलं आपलींच नाहींत का?" असें कांहीं तरी म्हणून विनायकराव सरलेचें समाधान करूं पहात, आणि लगेच स्वतः रडूं लागत. गांवांतली मंडळी झोपडीबाहेर जमली व पुढील व्यवस्थेला लागली. धारोपंत नागे, कृष्णंभट फुरशे, वगैरे दुष्ट लोकहि लोकांत वाईट दिसूं नये म्हणून आले आणि शेताच्या बांधावर विड्या फुंकत बसून, प्रेतें ब्राह्मणांच्या स्मशानांत जाळूं द्यावयाचीं नाहींत असा कट करूं लागले. उजाडण्याच्या सुमारास मला एका वृद्ध संभावित गृहस्थानें बाहेर बोलावलें आणि पुढील व्यवस्था करण्याची वेळ झाली वगैरे ते बोलूं लागले. "ब्राह्मणाच्या स्मशानांत जाळूं लागलों तर विचका होण्याचा संभव आहे" अशा प्रकारची भाषा ते हळू हळू बोलूं लागले, तेव्हां त्यांचा भावार्थ ओळखून "अस्पृश्यांच्या स्मशानांत त्यांना घेऊन जावयाचें" असें मी

विनायकरावांच्या वतीनें सांगितलें. झोंपडींतून मुलांना उचलण्यास दोघे संभावित लोक आले. त्यांना रडूंच कोसळलें आणि त्यांचे हात पाय कापूं लागले. पण कटु कर्तव्यकर्म पार पाडणें त्यांना भागच होतें आणि त्यांनीं तें पार पाडलेंच. सरला आकान्त करील आणि टाहो फोडील असें वाटलें होतें. पण बिचारीनें तसें कांहीं केलें नाहीं.

प्रिय अपत्यांच्या मृत्यूचा हा देखावा पाहून आपणांला अपत्यसुख नाहीं हेंच बरें असें वाटलें !

विनायकरावांनीं भातसारा शेतकऱ्यांनीं भरूं नये अशा अर्थाचें भाषण केलें म्हणून त्यांना अटक करण्यांत येणार आहे अशी खात्रीलायक बातमी कांहीं दिवसांपूर्वी कळली आहे. बिचाऱ्याच्या नशिबीं काय काय दुःखें आहेत कोणाला ठाऊक. लोकांमध्यें एवढी मानमान्यता असून त्याच्या नशीबीं पुनः तुरुंगवास येणार. समाधानाची एवढीच गोष्ट आहे कीं पतिपत्नींमधील प्रेम अत्यन्त सात्विक आणि अखंड आहे. असें प्रेम असणें हें तरी एक महत्-भाग्यच आहे !

— भाऊराव काळे

## [ ४४ ] इंदु वहिनी पळाल्या

**तार ( भाषान्तर )**

| जरूरीची<br><br>पुणें ता. ७–३–२७ | भाऊराव काळे यांस<br>विनायकराव भोळे यांचे येथें<br>पांचबावडी. |
|---|---|

| | | | |
|---|---|---|---|
| ताबडतोब | निघा | इन्दुवहिनी | नाहींशा |
| झाल्या | नारायणराव | पाठकांबरोबर | पळाल्या |
| म्हणतात | | | |

## [४५] " कालासारखें औषध नाहीं "

अंबेवाडी, जिल्हा सातारा.
६–३–२७.

प्रियमित्र विनायकराव भोळे यांस नारायण पाठक, हल्लीं मुक्काम जिल्हा सातारा याचे नमस्कार. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें. बाकी आपण स्वकीय कुशल काय लिहिणार ? आपल्या अपत्यांच्या मृत्यूची हकीकत भाऊरावांच्या पत्रावरून पुण्यासच कळली. पण तेथें जाऊन मी आपल्या सारख्यांचें समाधान काय करणार म्हणून बेत रहीत केला. बिन्दुमाधव म्हस्करांच्या बोलण्यांत पुष्कळ वेळां अंबेवाडी या गांवांतील देवळाच्या कोंपऱ्यांत पडलेल्या एका अत्यंत जुन्या शिलालेखाचा उल्लेख येत असे त्याची नकल करून आणावी व तो खरोखरच जुना आहे कीं काय हें पहावें म्हणून येथें आलों आहें. देवळांतच उतरलों आहें. शिलालेख धुवून स्वच्छ केला आहे. त्यावर शाई फासून एक नकल काढणार आहें व एक फोटोग्राफहि घेणार आहें. शिलालेख शके ७०५ चा दिसतो. संस्कृत श्लोक आहेत. पण खालीं गद्य आहे त्यांत दोनतीन जुन्या मराठीचीं रूपें आढळतात. शक निश्चित झाल्यास व रूपें मराठी ठरल्यास " मराठी "चा जन्मकाळ ठरविणें सुलभ होईल.

आपलें दुःख हलकें व्हावें म्हणून हें सर्व लिहित आहें, पण दुःख कालावधीनेंच हलकें व्हावयाचें आहे. इराणांतील एका शहाची बिब्बी वारली तेव्हां त्यानें एकेका प्रसिद्ध हकीमाला बोलावून आणून " माझ्या मनाच्या दुःखाला कांहीं दवा आहे का ? " असें विचारलें. कोणाला कांहीं दवा सांगतां येईना, म्हणून त्यानें प्रत्येकाचा धिक्कार करून धक्के देऊन घालवून दिलें. अखेर एका चाणाक्ष हकीमानें " परवरदिगर खुदाच्या कुदरतींत अलबत् दवा आहे " असें म्हटलें. 'ही दवा कोठें मिळते', असें शहानें विचारल्यावर " अक्कलशून्य मनुष्याला ही दवा कशी आहे ? कोठें मिळते वगैरे समजत नाहीं. अक्कलमंद मनुष्याला मात्र कळते. ही अजब दवा अत्यंत स्वस्त आहे, जिकडे तिकडे ती मिळते. हवेप्रमाणें आपण ती रोज घेतच असतों—हिचें नांव 'वक्त.' 'वक्त बडी अकसीर दवा है' असें

हकिमानें सांगितलें. त्याला लगेच हजार मोहरा मिळाल्या. ("वक्ता-शिवाय दुसरें कांहीं औषध आहे का" म्हणून शहानें विचारल्यावर "होय अलबत् आहे. ही दवा फार गोड आहे, सुरेख आहे, शानदार आहे. या दव्याचें नांव "दुसरी शादी" असें सांगितल्यावर शहानें रुष्ट होऊन त्याला फटके मारून घालवून दिलें. पण एक महिन्याच्या आंत ही "शानदार दवा" जनानखान्यांत आणली असा या गोष्टीचा उत्तरार्ध आहे. तो अप्रस्तुत म्हणून सोडून देऊं.)

तुझें समाधान करावें म्हणून गंभीरपणें लिहूं लागलों, पण अखेर स्वभावानुसार अप्रासंगिकपणा केलाच; तथापि उद्देश ध्यानांत घेऊन क्षमा करावी.

सरलावहिनींना म्हणावें, "छोटू आणि छोटी हीं बाल-रत्नें ईश्वरें दिलीं तीं ईश्वरें नेलीं." शुक्राची चांदणी उगवावी आणि घटकेंतच अस्तास जावी तशांतलाच आपल्या मुलांचा प्रकार झाला. **भवितव्यता बलीयसी.** त्यांच्या आठवणी मला वारंवार होतात आणि डोळ्यांत अश्रू येतात. अशीं मुलें थोड्यांनाच लाभतात. तुम्हांला लोकांनीं वाळीत टाकलें, महारवाड्यांत राहण्यास लावलें, हरतऱ्हेच्या कंड्या पिकविल्या, पण या बालरत्नांचें संगोपन आणि त्यांचें कौतुक करण्यांत तुम्हांला जो दिव्य आनंद व्हायचा त्यापुढें लोकांच्या छळाचें तुम्हांला कांहींच वाटलें नाहीं. आतां मुलें गेलीं तरी चिंगी आहेच. तिचें मुलीप्रमाणें संगोपन करीत आहां, तें तसेंच करीत रहावें. त्यांत अत्यंत सात्विक आनंद आहे. शोक करीत बसूं नये. तुम्ही शोक करीत बसल्यास विनायकरावांना जें दुःख होत आहे त्यांत अधिक भर पडेल. मुलांची हौस तुमच्यापेक्षां त्यांना अधिक होती, त्यांचें कौतुक तुमच्यापेक्षां ते अधिक करीत. त्यांनीं अंगीकारलेल्या सार्वजनिक कार्याच्या व्रतांत या दुर्धर प्रसंगानें कमतरता येईल आणि त्यांचें मन कमकुवत होईल असें कांहीं एक करूं नये. त्यांचें मन तुमच्यापेक्षांहि कोमल आहे असें मी मित्रप्रेमानें केवळ म्हणतों असें नाहीं. पतीनें वास्तविक पत्नीचें समाधान करावयाचें असतें, पण तुमच्या येथें निराळा प्रकार आहे. ते बायकांप्रमाणें रडणार नाहींत, पण मनांत झुरत राहातील. बाहेरून ते

तत्वज्ञासारखे वागतील, आणि विनोदहि करतील, पण हृदय आंतल्याआंत जळत असेल. बाकी मी कोणाला उपदेश करीत आहें? तुम्ही दोघेंहि समंजस आहांत. तुम्हांला माझ्यासारख्या फटिंगानें उपदेश करणें हें गैरच, पण राहवलें नाहीं म्हणून कांहीं तरी प्रासंगिक अप्रासंगिक लिहिलें आहे. तसें पाहिलें तर वचनभंग करून काशी ढवळे हिच्या आयुष्याचा नाश उघड्या डोळ्यांनीं करणारा व तिचें दुःख कठोरपणें पाहत राहणाऱ्या मला पाप्याला कोमलतेचा उपदेश करण्याचा अधिकार काय? कोळशानें हिरकणीला उपदेश करण्यासारखेंच हें आहे. कळावें.

नारायण पाठक

---

[४६]

## ज्ञानप्रकाश ७–३–२७

### सौ. इन्दुबाई काळे यांना पळवून नेलें.

इतिहाससंशोधक नारायणराव पाठक यांजवर आरोप.

( एका बातमीदाराकडून )

अंबेवाडी, सातारा जिल्हा, ९–३–२७.

पुण्याचे प्रसिद्ध कॉन्ट्रॅक्टर भाऊराव काळे यांच्या पत्नी सौ. इन्दुबाई काळे या पुण्याहून इतिहाससंशोधक नारायणराव पाठक यांचेबरोबर पळून आल्या व अंबेवाडी या गांवीं देवळांत या उभयतांना पकडण्यांत आलें असें समजतें. सौ. इन्दुबाई काळे यांचा जबाब घेऊन त्यांना सोडण्यांत आलें आहे. वहिमी नारायणराव पाठक यांना एक दिवस अटक करून जामिनावर सोडण्यांत आलें आहे. सौ. इन्दुबाईंनीं आपणांस प्रसिद्ध गायन–वादन–पटु बिन्दुमाधव म्हस्कर यांनीं फसवून आणून देवळांत सोडलें असा जबाब दिला व सदर म्हस्कर हल्लीं फरारी आहेत म्हणून रा. पाठक यांना जामिनावर सोडण्यांत आलें म्हणतात. पळवून कोणी जरी नेलें असलें तरी सौ. इन्दुबाई काळे यांचा नैतिक गुन्हा कमी होत

नाहीं. भाऊराव काळे त्यांना पुन्हां घरांत घेतील किंवा नाहीं याबद्दल शंका आहे, अशा प्रकारची भाषा गांवांत चालू आहे. खटला सुरू झाल्यावर त्याची हकीकत कळविण्यांत येईल.

---

## [ ४७ ] सात वर्षांची सजा

पुणें, १५-३-२७.

प्रियमित्र विनायकराव भोळे यांस सा. न. वि. वि.

तुम्हांला ७ वर्षांची सजा झाली व रत्नागिरीस पाठविलें आहे हें कळलें. सजा व्हायची हें निश्चित होतेंच, पण फारच झाली असें वाटतें.

सरला पांचबावडीसच राहणार आहे व आपल्या शाळा आणि इतर समाजकार्यें चालू ठेवणार आहे. मला ती पुण्यास यावी असें कितीहि भगिनीप्रेमामुळें वाटत असलें तरी ती करीत आहे तेंच बरोबर आहे हें विवेकबुद्धीला पटतें. इकडची काळजी अगदीं करूं नये. तिला द्रव्याची कधींहि ददात पडणार नाहीं. तिला सोबत व्हावी व सैंपाकाची दगदग चुकावी म्हणून येथून एक पोक्तबाई पाठविणार आहें.

माझ्या इंदूला घरांत कोणत्याहि प्रकारें मी दुःख देत नाहीं. ती शुद्ध असावी असेंच माझें मत आहे. तथापि फरारी बिन्दुमाधव म्हस्कर सांपडून सर्व प्रकरणाची साद्यन्त हकीकत कळल्याशिवाय माझें मन पूर्ण समाधान पावूं शकणार नाहीं. तिला मी बाहेरून अगदीं कांहीं एक झालेंच नाहीं असें वागवतों, पण बंधु-भगिनीप्रमाणें वागतों. लोकांना मात्र कांहीं एक फरक दिसूं देत नाहीं.

नारायणराव पाठकांबद्दल माझे मनांत केव्हांहि किन्तु नव्हता आणि आतांहि नाहीं. अलीकडे त्यांनीं तत्त्वज्ञानाचा अभ्यास विशेष चालविलेला दिसतो. केवळ विवेकबुद्धीचे द्वारें ( Reason चे द्वारें ) पूर्ण ज्ञान व्हावयाचें नाहीं, त्याप्रमाणेंच केवळ तार्किक ज्ञानानें समाधान व्हावयाचें नाहीं. मनुष्याचा जन्म केवळ ज्ञानार्जनाकरितां नसून सर्वांगीण आत्मविकासाकरितां

आहे, वगैरे वगैरे ते कांहीं वोलत असतात तें मला पटतें; तुम्हांला पटेल किंवा नाहीं कोणास ठाऊक !

जेलमध्यें शिक्षा झाल्यास मुलाखती होऊं शकत नाहींत; पत्रव्यवहारहि बंद होतो; म्हणून आपलें ध्येयशीलत्व एवढ्या अवधीपुरतें तरी बाजूस ठेवून तेथें सत्याग्रह करण्याच्या फंदांत पडूं नये. तथापि तेथें काय होणार याबद्दल मला भीतीच वाटते.

तीन महिन्यांनीं भेटण्यास येईनच. सरलेला आणि चिंगीलाहि आणीन.

**भाऊराव काळे**

## [ ४८ ] सहा वर्षांनंतर

पांचबावडी,
ता. १५-९-३३.

प्रियमित्र भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

कालच रत्नागिरी जेलमधून सुटका झाली. माझ्याकडून तेथील कामें पुरतीं होत नसल्यामुळें जेलच्या शिक्षा नेहमीं होत होत्या आणि जेलमध्यें आपल्या मुलाखती होत नव्हत्या किंवा पत्रव्यवहारहि होऊं शकत नव्हता. इतर ठिकाणच्या राजकीय कैद्यांना पुष्कळ सवलती मिळत, किंबहुना त्यांना जेलखान्याचीं कांहींच दुःखें अनुभवावीं लागत नसत, व वर्तमान-पत्रें मिळत, खेळ होत, पुराणें व्याख्यानें चर्चा होत, इत्यादि गोष्टी जेल-मध्येंहि ऐकत होतों. पण माझ्या नशिबीं " सी " वर्ग आणि हातकड्या, दंडाबेड्या, मिठाची कांजी, वगैरे गोष्टी लिहिलेल्या होत्या त्याला कोणाचा इलाज नाहीं !

येथें आल्यावर सरलेनें आमची रात्रींची शाळा सहा वर्षें चांगली चालविली आणि एकंदरींत लोकांच्या आदरास ती पात्र झाली हें ऐकून संतोष झाला. आपण तिला पैशाची मदत केलीत याबद्दल ऋणी आहें.

या सहा वर्षांच्या जेलखान्यामुळें प्रकृति खालावली आहे. काळजी करण्यासारखी स्थिति नाहीं, पण आपण सर्व मंडळी इकडे यावी अशी इच्छा मात्र आहे. कंत्राटांच्या कामामुळें तुम्हांला वेळ नसल्यास इंदूताईंना तरी पाठवावी. आणि नारायणरावांनींहि कांहीं दिवस इतिहास-जिज्ञासेला विश्रान्ति देऊन इकडे येऊन रहावें. काम कांहीं नाहीं, पण आपल्या खऱ्या इष्टमित्रांच्या संगतींत (जेलखान्यांतून सुटल्यानंतर विशेषेंकरून) रहावेंसें वाटतें, म्हणून सर्वांना बोलावीत आहें. इतके दिवस स्वाभिमानानें पैसे मागत नव्हतों आणि आपण पाठविलेत तरी ते (घ्यायचे नाहींत म्हणून नव्हे तर मूळ स्वभाव म्हणून) गरीब मुलांमुलींना, रात्रींच्या शाळेच्या मास्तराला, आणि इतर गोरगरिबांना वांटून टाकीत असें; पण आजारांतून बरा होईतोंपर्यंत आपणांजवळ पैसे मागतों. चार महिन्यांत खडखडीत बरा होईन असें वाटतें. आपण प्रेमानें देतां म्हणून मागतों, माझा हक्क असा काय आहे? बाकी हक्क आहेच म्हणा, कारण आपली बहीण देऊन बसलेले आहांत हा एक गुन्हा आपण केला आहे आणि दुसरा अक्षम्य गुन्हा असा कीं आपण माझ्यावर अहेतुक आणि निःसीम प्रेम करतां! प्रेम करणें हें चांगलें नाहीं. प्रेम करणें म्हणजे स्वतःस बुडवणें.

सहा वर्षांत देशामध्यें, समाजामध्यें आणि कुटुंबांत पुष्कळच क्रांति झाली आहे. सत्याग्रह सुरू झाला, जोरांत आला, पडला, मृतप्राय झाला. अस्पृश्योद्धाराचा आणि त्यांच्या मन्दिरप्रवेशाचा प्रश्न धसाला लागत आहे. "वर्तुलपरिषदां"चीं चक्रें तीनदां फिरलीं. कुटुंबाकडे पाहिलें तर पुष्कळच फरक झाला आहे. असो.

इन्दुवहिनींबद्दल तुमचें मन किंचित् साशंक असलें तरी तुमच्या सुकूं लागलेल्या प्रेमवल्लींना पुनः पालवी फुटूं लागली आहे हें ऐकून किती समाधान झालें म्हणून सांगूं? नारायणराव पाठकांचें पत्र आलें आहे. काशी ढवळे हिच्याशीं लग्न करण्याची स्वारीची तयारी झाली आहे असें दिसतें! केवढी क्रान्ति ही! काशी ढवळे आजारी आहे असें ऐकतों.

उभयतांची प्रेमानें चेष्टा करण्याचें काम कांहीं दिवस लांबणीवर पडणार ! काशी ढवळे हिला " राणीच्या बागेंत आणि प्रिन्स ऑफ् वेल्स म्युझिअममध्यें काय काय पाहिलंत आणि काय काय ऐकलंत " असं मी विचारणार आहें. पण हे पुढचे विचार. सहा वर्षांच्या तुरुंगवासामुळें माझें शरीर म्हाताऱ्याच्या सारखें झालें असलें तरी मन म्हातारें झालें नाहीं हें वरील सहजगत्या लिहून गेलेल्या वाक्यावरून कळेल.

आमच्या सौभाग्यवतीनें माझें सामाजिक काम चालविलें याबद्दल उपकार वाटतात, पण चिंगीचें लग्न माझ्या पश्चात् उरकून घेतलें म्हणून किंचित् वाईट वाटतें. गणपतराव हरळे नांवाचे अस्पृश्योद्धारक संस्थेचे जे चिटणीस आहेत त्यांनीं चिंगीला मुंबईस ती गेली असतां पाहिलें होतें. त्यांनीं तिचें लग्न उरकून घ्यावयाचें असल्यास अस्पृश्य समाजांतील काळोबा बोरवणकर नांवाचे एक मॅट्रिक झालेले गृहस्थ आहेत, शिकलेले आहेत, चांगले आहेत, जी. आय्. पी. मध्यें नोकरी आहे वगैरे लिहिलें आणि सौ.ला घरीं चालत आलेलें हें स्थळ दवडूं नये असें वाटून, तिनें माझ्या पश्चात् हें कार्य उरकून घेतलें, हें एका अर्थी बरेंच झालें. मुलीचें त्यांत हितच झालें. मुलगा गरीब आहे; पण अस्पृश्यांमध्यें इतका सालस आणि हुशार मुलगा मिळावयाचा नाहीं असें सौभाग्यवती म्हणते. चिंगीला आणि तिच्या यजमानांना भेटण्याची इच्छा आहे, पण उगाच खर्च होतो म्हणून येऊं नये असें लिहिलें आहे. आपण सर्वांनीं अगत्य यावें,—आपणांला पैशाची ददात नाहीं. अगत्य यावेंच.

नारायणराव पाठक यांचें भलें मोठें पत्र आलें आहे. त्यांत त्यांनीं या सहा वर्षांत त्यांच्या मनामध्यें झालेली क्रान्ति वर्णन केलेली आहे. स्वारीचें मन काशी ढवळे हिच्याशीं लग्न करण्यास अनुकूल झालें आहे, हें त्यांच्या पत्रांतल्या पुढील उताऱ्यावरून कळून येईल. आपला ज्ञानमार्ग चुकीचा होता हें सांगण्याकरितां जगांतच ज्ञानमार्गाविषयींचा विश्वास कमी होत चालला आहे असें ते भासवीत आहेत. पण शेवटीं काशी ढवळे डोकावतेच !

"पदार्थविज्ञानशास्त्रज्ञांचा जोरकस आत्मप्रत्यय जाऊन 'अणोरणीयान्' असा जो इलेक्ट्रॉन त्याच्या स्वरूपासंबंधानें आश्चर्यमुग्ध होऊन त्याच्यापुढें त्यांना हात जोडून उभें रहावें लागत आहे. रसायनशास्त्रज्ञांना मूलद्रव्यांच्या मिश्रणापासून जीवोत्पत्ति करतां येईल असें वाटत होतें, पण आतां ही आशा व्यर्थ ठरू पहात आहे. जीवनशास्त्रज्ञांना डार्विनचा विकासवाद म्हणजे एक जीवनाचें गूढ उकलणारी गुरुकिल्लीच वाटत होती, पण या विकास-वादाच्या गुरुकिल्लीनें ज्ञानाचीं कांहीं कपाटें उलगडलीं आहेत तरी कांहीं अंतिम प्रश्नांचीं उत्तरें ज्या पेटींत ठेविलेलीं आहेत त्या पेटीला ही किल्ली लागू पडत नाहीं असें दिसूं लागलें आहे. मानसशास्त्राला आत्मा हा पदार्थच काय आहे हें कळेनासें झालें आहे. आणि अलीकडे तर बौद्धिक व्यापारापेक्षां जाणीव नसलेल्या मनोवस्थांचेंच प्रस्थ माजत चाललेलें आहे. राजकारणांत केमल पाशा, मुसोलिनी, हिटलर, लेनिन, गांधी, वगैरेंचे नवे नवे प्रयोग होत आहेत व ते कमीअधिक यशस्वी होत आहेत आणि इतिहासशास्त्र व समाजशास्त्र यांतील परंपरागत सिद्धांतांना हरताळ फासीत आहेत. आणि अखेर मला तर असें वाटूं लागलें आहे कीं ज्ञान हें मानवी मनाच्या पूर्णपणें हस्तगत कधीं व्हावयाचें नसून "नेति नेति" हेंच म्हणत बसावें लागणार.

अशा स्थितींत कोठल्याहि क्षेत्रांत ज्ञानाच्या पाठीमागें लागून जीवाचें बलिदान करण्यांत फायदा काय? मनुष्यजन्म हा ज्ञानप्राप्तीकरितां नसून देहधर्म संभाळून शक्य तेवढें ज्ञान मिळवावें, शक्य तेवढा कलाविला-साचा आनंद उपभोगावा, शक्य तेवढें इतरांच्या उपयोगीं पडून त्यांना आनंद देण्याचा प्रयत्न करावा एवढ्याकरितां मनुष्यजन्म आहे. केवळ देहसुखानें समाधान व्हावयाचें नाहीं, कारण आपण पशु नाहीं. केवळ ज्ञानमार्गानें समाधान व्हावयाचें नाहीं, कारण आपणाला जिज्ञासेशिवाय इतर आकांक्षाहि आहेत. केवळ कलेच्या पाठीमागें लागून उपयोगी नाहीं, कारण एकटी कला ज्ञानाची व नीतीची भूक शमवूं शकत नाहीं. केवळ कर्ममार्ग उपयोगाचा नाहीं; कारण ज्ञानाशिवाय मनुष्य आंधळा आहे व

कलेशिवाय आयुष्य नीरस आहे. तात्पर्य–( उच्च वातावरणांतून हास्यास्पद रीतीनें खालीं येऊन मी म्हणतों कीं ) मनुष्यानें लग्न केलें पाहिजे, निदान मी लग्न केलें पाहिजे. कोणाशीं तें तुला ठाऊकच आहे. या बाबतींत पूर्वीचा तोरा सोडून देऊन काशी ढवळे हिला " अग अग काशी, मला कां नेशी " असें म्हणण्याची पाळी आलेली आहे; पण या प्रसंगांतून तुमच्यासारखे मध्यस्थ मला सोडवितील अशी आशा आहे. "

नारायणराव पाठक व काशी ढवळे या तुल्यगुण वधूवरांना एकत्र आणण्याचें काम आपल्याकडे आहे, तें आपण लवकरच हातीं घेऊं. तिच्या वडिलांना पत्र लिहावें म्हणतों.

**विनायक भोळे**

---

[ ४९ ] विनायकराव अत्यवस्थ

**तार** ( भाषांतर )

| जरूरीची<br>पांचबावडी ५–१०–१९३३ | | भाऊराव काळे कॉंट्रॅक्टर<br>सदाशिव पेठ, पुणें. | |
|---|---|---|---|
| विनायकराव | अत्यवस्थ | आजारी | सर्वांनीं |
| ताबडतोब | यावें. | | |

---

[ ५० ] ततः किम् ?

पांचबावडी,
८–१२–१९३३.

मित्रवर्य रा. रा. भाऊराव काळे यांस नारायणराव पाठक याचे साष्टांग नमस्कार वि. वि.

आपण इकडे येऊं शकलां नाहींत म्हणून वाईट वाटतें. सवडींत सवड काढून विनायकरावांना भेटून जावेंच. त्यांची प्रकृति कशी आहे हें दररोज सविस्तर कळवावें म्हणून लिहिलें त्याप्रमाणें लिहीत आहें. ते आपली वारंवार आठवण काढीत असतात. इन्दुताई येथें आल्यामुळें त्यांना बरें वाटलें. इन्दुताईंनीं येथें आल्यापासून घरांतील कामें संभाळण्याचा जणूं कांहीं मक्ताच घेतलेला दिसतो. सरलेचें आणि त्यांचें चांगलें सूत जमलेलें आहे. आणि घराकडे फारसें पहावें लागत नसल्यामुळें पतीची सेवा करण्यास त्या बऱ्याच मोकळ्या झाल्या आहेत. इन्दुताईंनीं मोठ्या कुशलतेनें पूर्वींचीं सगळीं बिलें देऊन टाकलीं आहेत आणि घरांत धान्य, भाजीपाला, दूध वगैरेची त्या ददात पडूं देत नाहींत–आणि हें सर्व सरलावहिनींचें मन न दुखवितां आणि आपली श्रीमंती न दाखवितां त्या करीत आहेत, ही विशेष आनंदाची गोष्ट आहे.

विनायकराव आतां खरोखरच सुधारत आहेत. सकाळीं उठल्यावर चांगले बोलूं शकतात. आज सकाळीं आम्हीं सगळेजण त्यांच्या खोलींतच चहा घेत होतों तेव्हां ते पूर्वींच्या तरतरीनें बोलत होते. अर्धा एक तास बोलणें झाल्यावर ते थकले आणि मग त्यांना थोडीशी गुंगी आली ही गोष्ट वेगळी. सरलेनें चहा बिस्किटें वगैरे सामान आणल्यावर ते मला म्हणाले, " नारायणराव, लग्न केलं असतंत तर अशी सेवा करणारी बायको तुम्हांला मिळाली असती आणि तुमची प्रकृति बिघडली नसती."

" पण एखादी कृत्या मिळाली असती तर मी याच्या आधींच मेलों असतों " मी हंसत म्हटलें.

ते म्हणाले, "नाहीं, असें म्हणूं नका. आपल्या पांढरपेशा समाजांत नवरे वाईट असतील कदाचित्, बायका फार थोड्या वाईट. **"कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति"*** असें म्हणतात, आणि तें खरें

* ( —अर्थः—वाईट मुलगा उत्पन्न होईल, पण वाईट माता दृष्टीस पडावयाची नाहीं. )

आहे. मी या वचनाच्या जोडीला माझें अनुभवावर आधारलेलें असें वचन घालीन कीं "**कुभर्ता जायेत क्वचिदपि कुजाया न भवति** "* असें म्हणून त्यांनीं सरलेकडे स्नेह व आदर यांनीं युक्त अशा दृष्टीनें पाहिलें. तेव्हां ती म्हणाली, " मला खूष करण्याकरितां कांहींतरी म्हणायचं झालें " असें ती म्हणाली खरी, पण डोळ्यांत अश्रूबिन्दु येऊं लागल्यामुळें बिस्किटें आणण्याचें निमित्त करून ती आंत गेली आणि एक दोन मिनिटांनीं जणूं कांहीं धुरानें डोळ्यांतून पाणी येत आहे असें दाखवून पदरानें डोळे पुशीत पतीला आणखी बिस्किटें व चहा देऊं लागली.

बिस्किटें खातां खातां विनायकराव म्हणाले कीं " या माझ्या दुखण्याला तुम्ही फार भितां असं दिसतंय. पण माझी मनोदेवता मला सांगते कीं मी कांहीं या दुखण्यांत मरत नाहीं. मला अजून पुष्कळ कार्य करायचं आहे."

" टिळकांना आणि आमच्या इतिहासकार राजवाड्यांना देखील असंच वाटत होतं." मी भान न राहिल्यामुळें आणि मित्राशीं वाद करण्याची प्रवृत्ति प्रबळ होऊन बोललों.

" कबूल आहे, त्यांच्याप्रमाणें माझाहि भ्रम असेल. पण आपण आणखी कांहीं वर्षे जगणार आणि कांहीं राजकीय कार्य करणार असं वाटत आहे खरं." मी यावर कांहींच बोललों नाहीं पण तेच विलक्षण रीतीनें हंसून म्हणाले, " बाकी आमचं कार्य म्हणजे काय, तर गांव सोडून न जाण्याचा हुकूम मोडून पुनः तुरुंगांत जायचं! आजारी आहें म्हणून बरं आहे, नाहीं तर आम्ही आतां पुनः तुरुंगांतच असावयाचे!"

" तुरुंगांत पुनः जाण्यांत काय अर्थ आहे? काँग्रेसचा पराभव झालेला आहे आणि हा पराभव कबूल करून पुढच्या युद्धाची पुनः तयारी करण्यांत खरा शहाणपणा नाहीं का?" मी असं म्हटल्यावर ते म्हणाले " बरोबर आहे, तुमच्या दृष्टीनें हें बरोबर आहे. पण आमची दृष्टि निराळी आहे."

* वाईट पति दिसेल, पण वाईट पत्नी सांपडावयाची नाहीं.

"निराळी आहे हें कोणीहि सांगेल." इन्दुताई, कधीं न बोलणाऱ्या त्या मध्येंच म्हणाल्या. "पण बरोबर आहे का, हा प्रश्न आहे."

"आतां वाद करण्यांत फायदा काय आहे?" सरला म्हणाली. तिला भीति वाटली, कीं वाद वाढून पतीला उगाच थकवा मात्र यावयाचा. "त्यांचीं मनें बदलणें केव्हांहि शक्य नाहीं!"

"मी वाद करीत नाहीं, भिऊं नकोस" विनायकराव म्हणाले. "पण एवढंच सांगतों कीं माझीं मतं आतां बदलायचीं नाहींत. आणि कोणाचीं मतं वादानें बदलत आहेत? नारायणराव तूं इतिहास-संशोधन करून काय मिळवलंस? एक तरी निर्विवाद सिद्धान्त ठरविला आहेस का? आणि जुन्या इतिहासांतली एखादी तिथि, नाहीं तर एखादें नांव, नाहीं तर दुसरं असंच कांहीं निश्चित ठरवून जगाचा असा काय फायदा होणार आहे? आणि इन्दुताईनें कलेच्या पाठीमागें लागून काय मिळवलं आहे? आणि हिच्या (सरलेच्या) भाऊनें कंत्राटांत पैसे मिळवून तरी काय मिळवलं आहे? "ततः किम्" हा प्रश्न केव्हांहि विचारतां येईल?"

"मी आतां वाद करूं इच्छीत नाहीं" मी म्हटलें आणि कपबशा वगैरे आवरूं लागलों, तेव्हां विनायकराव स्मित करून म्हणाले "तुम्ही सगळे या दुखण्याला फार भितां असं दिसतं आहे. मी आतां चांगला बरा होत आहें. आणि मी वादहि आतां करीत नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं जो तो कोठल्या तरी ध्येयाच्या मागें लागलेला असतो आणि त्यांत मरण आलें तरी त्याला तेंच बरें वाटतें." ते आणखी पुढें कांहीं बोलणार इतक्यांत गांवांतली कांहीं भिक्षुकमंडळी त्यांना भेटण्यास आली. त्यांना आंत बोलावल्यावर त्यांच्या पैकीं पुढारी असलेला कृष्णंभट फुरशे विनायकरावांना म्हणाला, "विनायकराव, आम्हीं सगळे आपणाला अशी विनंति करण्याला आलों आहोंत, कीं आपण एवढे चांगले असून फुकट चालले आहांत. आपण अस्पृश्यांशीं व्यवहार करण्याचें आजपासून सोडून द्या आणि प्राय-

श्चित्त घ्या म्हणजे आम्ही सगळेजण तुम्हांला हरतऱ्हेची मदत करूं आणि प्रत्यक्ष मृत्यूच्या दाढेंतून आपणांला सोडवूं."

विनायकरावांनीं कांहीं एक उत्तर दिलें नाहीं. "बरं आहे, मी विचार करतों" एवढेंच म्हणून त्यांनीं तोंड दुसरीकडे फिरवलें, आणि अंथरुणावर पडून स्वस्थ निजून राहिले. आम्ही कपबशा आवरूं लागलों, आणि कृष्णंभट वगैरे मंडळीनें हळू हळू पाय काढला!

विनायकरावांना दुपारीं चांगली झोंप लागली होती. प्रकृति खरोखरच सुधारत आहे. आजच्या प्रमाणें उद्यांहि रात्रीं पत्र लिहीन. मी येथें विनायकराव चांगला बरा होईपर्यंत रहावें म्हणतों, कळावें.

आपला,
**नारायणराव पाठक**

---

## [५१] भलत्या वेळीं भलतं बोलण्याची लकब

पांचबावडी,
१०–१२–३३.

मित्रवर्य भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

आज सकाळीं विनायकराव उशीरानेंच उठले. काल रात्रीं चांगली झोंप लागली होती. कालच्याप्रमाणेंच चहापाणी एकत्र झालें. विनायकरावांनीं दुधाचा घावन करण्यास सांगितला व तो मोठ्या चवीनें खाल्ला. मींहि एका घावनावर आणि कांहीं बिस्कीटांवर ताव मारला. मित्र आजारी असला तरी देहधर्म थोडेच राहतात! जग हें असं आहे!

चहा पीत असतांच गांवांतील केळकरपक्षीय कौन्सिल-प्रवेशवादी मंडळी भेटण्यास म्हणून आली. त्यांना देखील सरलेनें चहा आणून दिला. कांहींनीं घेतला, पण कांहींनीं बाटलेल्या मनुष्याकडचा चहा घेतला असतां गांवांत बोभाटा फार होईल या भीतीनें गांगरून जाऊन कांहींतरी निमित्त सांगितलें आणि चहा घेण्याचें टाळलें.

थोड्या वेळानें त्यांच्यापैकीं एकजणानें खिशांतून एक छापील पत्रक काढलें आणि त्यावर सही करण्याबद्दल विनायकरावांस विनंति केली, "सत्याग्रह सध्यां बंद ठेवावा आणि कौन्सिलें काबीज करावींत" अशा आशयाचें तें पत्रक होतें हें विनायकरावांनीं त्यावरून एक दोन मिनिटें नजर टाकल्याबरोबर त्यांना कळून आलें. पत्रक पुरें न वाचतांच ते म्हणाले, "माझी सही या पत्रकावर नाहीं मिळावयाची. केळकर आणि तुम्ही मंडळी करीत आहांत तें सगळं ठीक असेल, पण माझ्या सारख्या कट्टर मंडळींना हें पटत नाहीं, त्याला काय करायचं?"

"कां पटत नाहीं याचीं कांहीं कारणें तर सांगा?" त्यांपैकीं एक जणानें विचारलें, तेव्हां विनायकराव म्हणाले कीं "कारणें काय सांगणार? हा प्रश्न माझ्यासारख्यांच्या बाबतींत आतां वादविवादाचा राहिला नाहीं. ध्येयवादिता आतां माझ्या रक्तांत, हाडामासांत, हृदयाच्या अगदीं आंतल्या गाभ्यांत जाऊन माझ्या जीविताशीं इतकी एकरूप झाली आहे कीं ती आतां जीवितनाशाशिवाय नष्ट व्हावयाची नाहीं."

यावर मंडळीपैकीं एकजण म्हणाला, "पण राजकारणांत असं बोलून कसं चालेल? चर्चा करून एकमेकांचीं मनं वळवायला नकोत का?"

"बरोबर आहे, तुमचं म्हणणं." विनायकरावांनीं उत्तर दिलें. "आणि खरं बोलायचं म्हणजे मला केळकरांचा पक्षच विचाराच्या दृष्टीनें बरोबर वाटतो. पण हृदयांत काय झालं आहे कुणाला ठाऊक, तो पक्ष स्वीकारावासा वाटत नाहीं. कदाचित् हा खोट्या अभिमानाचा परिणाम असेल. पण वस्तुस्थिति अशी आहे खरी."

"भावनांना तुम्ही फार महत्त्व देत आहांत. राजकारणांत चुका ह्या व्हावयाच्याच. चुका झाल्यावर त्या दुरुस्त करण्यांत कांहीं कमीपणा नाहीं."

"कबूल, सगळं कबूल. पण प्रकृतिधर्म म्हणून कांहीं आहेच ना? कांग्रेसच्या विरुद्ध प्रामाणिकपणें तुम्ही बंड करीत आहांत हें मला

मान्य आहे; विचार केला म्हणजे तुमचें म्हणणें मला बरेंच समंजसपणाचें दिसतें हें कबूल; गांधींच्या आज्ञेनुसार पुनः पुनः तुरुंगांत जाण्यामध्यें जसें धैर्य आहे, तसें कांग्रेसविरुद्ध प्रामाणिकपणें बंड करण्यांतहि धैर्य आहे हेंहि मला मान्य आहे. पण माझ्या बाबतींत आतां हा विचाराचा आणि वादाचा प्रश्न राहिलेला नाहीं. माझी बुद्धि तुमच्या बाजूला आहे, पण भावना गांधीकडे मला ओढते त्याला मी काय करूं? आपल्या वेड्या-बागड्या मुलावर सगळ्यांत अधिक प्रेम करणं वेडेपणाचं आहे हें मातेला कळत नसतं असं नाहीं, पण तिचा इलाज नसतो. एखाद्या तरुणाला आपण विचारलं कीं तुझी प्रिया तुला अगदीं अप्सरेसारखी वाटते आणि तिच्याशीं बोलणं-चालणं तुला दिव्य आनंद देतं, हें योग्य आहे का?" तर तो म्हणेल कीं "हें सगळं मी जाणतों, पण माझा इलाज नाहीं."

यावर "पण राजकारण हा मातेच्या किंवा तरुणाच्या प्रेमासारखा का विषय आहे?" केळकरपक्षीय एक तरुण किंचित् रागानें म्हणाला, तेव्हां विनायकराव म्हणाले, "तुमचा प्रश्न अगदीं बरोबर आहे. पण मातेशीं किंवा त्या तरुणाशीं वाद घालण्यांत कांहीं अर्थ आहे का? शाळेंत शिकणाऱ्या मुलाला तुम्ही कितीहि सांगितलंत कीं विटीदांडू किंवा क्रिकेट खेळण्यांत कांहीं अर्थ नाहीं तर तो ऐकणार आहे? १६-१७ वर्षांच्या मुलीला तुम्ही सांगिलंत कीं पुरुषाशीं बोलतांना लाजण्यांत किंवा संकोच धरण्यांत कांहीं अर्थ नाहीं तर ती तुमचं म्हणणं कबूल करील, पण तिच्या वर्तनांत कांहीं फरक होईल का? गाणं-बजावणं ज्याला आवडतं त्याला विचारलं कीं गाण्या-बजावण्यापासून काय फायदा होतो, त्यांत वेळ गमावणं चुकीचं नाहीं का, तर तो तुमचा युक्तिवाद मान्य करील काय? नाहीं. वेळ आली म्हणजे रात्रींचा देखील रस्त्यावर उभा राहून तो गाणं ऐकत बसेल! आमच्या ह्या नारायणराव पाठकांना सांगा पाहूं कीं इतिहाससंशोधनाकरितां अविवाहित राहून हाडाचीं काडं करण्यांत कांहीं हंशील नाहीं—तो तुमचं ऐकणार आहे? मृत्युशय्येवर पडलेल्या आणि डॉक्टरांनीं आशा सोडलेल्या

पतीची सेवा करण्यांत अर्थ काय असं एखाद्या पत्नीला कोणी सांगूं लागला तर ती त्याचं ऐकेल का ? ”

विनायकराव हें शेवटलें वाक्य सहज बोलून गेले, पण सरलेला तें ऐकून कसेंसेंच झालें आणि तिनें डोळ्यांना पदर लावला. तिच्याकडे अर्थात् सगळ्यांची नजर गेली आणि मग तर ती मुळूं मुळूं रडूंच लागली. सहज चर्चेकरितां घेतलेल्या उदाहरणाचा असा विपरीत परिणाम झालेला पाहून विनायकरावांना आणि इतर सगळ्यांना वाईट वाटलें. “भलत्या वेळीं भलतं बोलण्याची माझी लकब जन्माचीच आहे, ती मेल्याशिवाय जायची नाहीं ”–असं पुन्हां भलतंच बोलून विनायकरावांनीं त्यावेळीं क्षणार्धांत पसरलेल्या खिन्न वातावरणांत अधिकच भर घातली आणि हें पाहून विनायकरावांनीं कपाळावर हात मारून घेतला आणि “उद्यां या, आपण आणखी बोलूं. भावनाच नव्हे तर युक्तिवाद माझ्या बाजूला आहे, पण आतां तें कांहीं नको,” असें म्हणून ते अंथरुणावरून उठले आणि विशेष शक्ति नव्हती तरी मंडळीला निरोप देण्याकरितां झोंपडीच्या दरवाजाबाहेर गेले. इन्दुताईंनीं सरलेला सैंपाकघरांत नेलें आणि अर्थात् तिची समजूत घालण्याचा तिनें प्रयत्न केला असेल.

मी काय करावें हें सुचेना म्हणून वेड्यासारखा हें सगळें पहात होतों !

आज संध्याकाळीं किंवा आतां रात्रौ पत्र लिहीत आहें तोंपर्यंत विशेष कांहीं झालें नाहीं. संध्याकाळीं कोणालाहि भेटण्यास येऊं दिलें नाहीं. आमच्या घरगुती गप्पा आणि थट्टामस्करी यांमध्यें चांगला वेळ गेला आणि विनायकरावांना पुष्कळच हुशारी वाटली. कळावें.

आपला मित्र,

**नारायणराव पाठक**

---

## [५२] स्त्रियांत देखील खिलाडूपणा आहे म्हणावयाचा !

पांचबावडी,

१२-१२-३३.

प्रियमित्र भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

आज विनायकरावांची प्रकृति पुष्कळच सुधारलेली दिसली. सकाळीं थोडेसे घराबाहेर चार पावलें फिरून आले. दुपारीं चांगली झोंप लागली होती.

संध्याकाळीं चहा वगैरे झाल्यावर उन्हें खालीं झालीं होतीं आणि विनायकराव सकाळच्याप्रमाणें घराबाहेर शतपावलीकरितां बाहेर पडणार होते, इतक्यांत चिंगी आणि तिचे यजमान काळोबा बोरवणकर हातांत गाठोडीं व वळकट्या घेऊन दत्त उभीं राहिलीं ! विनायकरावांना पाहिल्या-बरोबर चिंगीनें त्यांना खेड्यांतील पद्धतीनें नमस्कार केला व "उगाच खर्च करून येऊं नको म्हणून सांगितलंत तरी राहवेना म्हणून आल्यें, रागवूं नका" असें म्हणून अश्रूंनीं त्यांचे पाय भिजविले. तिच्या यजमानांनीं "आपण तुरुंगांतून सुटलेत, पण अत्यवस्थ आजारी आहांत असें ऐकलें म्हणून आपली आज्ञा मोडून आपल्या भेटीस आलों, रागावूं नये" असें म्हटलें आणि हातरुमाल डोळ्यांस लावला. चिंगीचें उत्कट प्रेम व तिच्या नवऱ्याचा चांगुलपणा पाहून आम्हांला सगळ्यांना रडूं कोसळलें. विनायक-रावांनींहि डोळ्यांना हातरुमाल लावला, आणि मनःक्षोभ आवरल्यानंतर म्हटलें "चिंगे, क्षमा कसली करायची ? मी रागावलों नाहीं. ऊठ, तुमचे उगाच पैसे खर्च होऊं नयेत म्हणून तसं लिहिलं. तुम्ही आलेत यांत मला आनंदच आहे. नाहीं तरी चांगला बरा झाल्यावर नवी दिवाळी करण्या-करितां मी तुम्हांला बोलावणारच होतों." काळोबांनाहि त्यांनीं असंच सांगितलें आणि "घरांत जाऊव चूळबीळ भरून चहा घ्या, मग पुढें आपण बोलूं" असें उभयतांना सांगून आपल्या पत्नीला, चिंगीला आंत घेऊन जाण्याचें सुचविलें आणि काळोबांची व्यवस्था लावण्यास मला रावसाहेबांनीं फर्माविलें !

पाहुण्यांचें चहापाणी होईपर्यंत इन्दूताईनीं झोंपडीबाहेर आंगणांत जाजम वळकटी टाकली होती, तेथें विनायकराव जाऊन बसले आणि कांहीं वेळानें आम्ही सगळेजण तेथें जाऊन बसलों. चिंगीजवळ व तिच्या यजमानां-जवळ हरतऱ्हेच्या सांसारिक चौकश्या व गोष्टी झाल्यावर विनायकराव म्हणाले, "तुम्ही सुखी आहांत हें ऐकून मला आनंद होतो. आणि तुम्हीं आलेत आणि भेटलेत हेंहि चांगलं केलंत. पण चार आठ दिवसांनीं मी चांगला बरा झाल्यावर काळोबांना जाऊं दे. त्यांना नौकरी संभाळली पाहिजे. तूं मात्र महिना दोन महिने रहा. बाकी, नाहीं राहिलीस तरच बरी! कारण माणसं अधिक झालीं कीं काम अधिक पडतं म्हणून आमची 'ही' रागवायची" त्यांनीं हें वाक्य नेहमींच्या संवईप्रमाणें थट्टेनेंच उच्चारलें, पण नेहमींप्रमाणें त्याचा थोडासा वाईट परिणाम झालाच. पण नेहमींप्रमाणेंच तो फार वेळ टिकला नाहीं! एक दोन मिनिटांतच सरला सांवरली आणि पुनः थट्टामस्करींत भाग घेऊं लागली.

गप्पागोष्टी संपत आल्या आणि दिवेलागणीची वेळ होत आली तेव्हां विनायकराव अंगणांतच चार फेऱ्या घालतों म्हणाले आणि दोनतीन घातल्या असतील नसतील इतक्यांत केळकर पक्षीय दोन तीन लोक तेथें आले. त्यांच्या बोलण्याचालण्यावरून ते चांगले समंजस दिसले. मंडळी पुनः बैठकी-वर बसल्यानंतर विनायकराव आपण होऊन म्हणाले, "वामनराव, बरे आलांत, माझी राजकारणांतली वृत्ति काय आहे हें तुम्हांला शांतपणें आज समजावून सांगतों. अहो, आम्ही भावनाप्रधान आणि तुम्ही बुद्धिप्रधान आहांत. पण तुम्ही आम्ही सगळेच आपापल्या परीनें देशकार्य करीत आहोंत, आणि एकमेकांना पोषक आहोंत."

"हें कसं?" वामनरावांनीं विचारलें.

"असं पहा. भावना निष्क्रिय विचाराला गति देते आणि विचार हा मोकाट धांवणाऱ्या अंधळ्या भावनेला पायबंद घालतो. टिळक आणि गोखले, तसंच गांधी आणि केळकर हे एकमेकांना पुरक आहेत." "म्हणजे गाढून

पुरणारे असंच ना?" मी मध्येंच उगाच कोटि सुचली म्हणून म्हटलें. कोटी ऐकून हंसून गंभीरपणें ते म्हणाले, "पूर्वी टिळक–गोखले–युगांत टिळक जहाल झाले म्हणून गोखल्यांना सरकार विचारूं लागलं. आतां गांधी जहाल ठरल्यामुळें केळकरपक्षाला सरकार जवळ करील आणि त्याचं समाधान करण्याचा प्रयत्न करील. देशाचा यांत फायदा नाहीं का?"

यावर वामनराव म्हणाले कीं "हा अप्रत्यक्ष फायदा जरी होत असला तरी युक्तिवादाच्या दृष्टीनें पक्षा-पक्षामध्यें तरतम-भाव नाहीं का? कोणता तरी एक पक्ष अधिक खरा आणि देशाला अधिक फायदेशीर असं आपणाला ठरवितां नाहीं का येणार? आणि देशाला अधिक फायदेशीर असलेला पक्ष कोणता हें तुमच्यासारख्यांनीं स्वीकारून दुसऱ्यांना तो स्वीकारण्यास सांगायला नको का?"

"फायदा आणि तोटा पाहूंला लागलेत," विनायकराव म्हणाले, "कीं जगांत कांहीं उच्च आणि उदात्त रहावयाचें नाहीं. आधीं फायदा आणि तोटा तुम्ही मोजणार कसा? दुसरं असं कीं उद्यां तुम्ही आपल्या शत्रूला जिंकलंत आणि स्वराज्य मिळवलंत तरी जिकडे तिकडे आबादी–आबाद होईल, देशांतलीं सगळीं दुःखें नाहींशीं होतील, आणि 'फायदा' होईल असं का तुम्हांला वाटतं? माझी समजूत आहे कीं स्वराज्य मिळालं तर देशांतल्या लोकांच्या जबाबदाऱ्या वाढून दुःखांत भर पडेल, म्हणजे आपला तोटाच होईल!"

"पण उच्च दर्जाचा आनंद नाहीं का वृद्धिंगत होणार? वामनरावांनीं विचारलें.

"हो आनंद वृद्धिंगत होईल. पण आनंद म्हणजे तरी काय? तो मानण्यावरच आहे. तो भावनेचाच एक प्रकार आहे. तुम्ही आमच्या भावनांची चेष्टा करणारे लोक शेवटीं भावनेवर आलेतच म्हणावयाचे!"

अशा रीतीनें हा वाद चालला असतां रात्र झाली. घरांत दिवाबत्ती झाली आणि सगळेजण वामनरावांचा निरोप घेऊन घरांत जाणार इतक्यांत

आदल्या दिवशीं आलेले घारोपंत नागे, कृष्णंभट फुरशे वगैरे मंडळी आली, आणि प्रायश्चित्त घेण्याबद्दल गोष्ट काढूं लागली. याच सुमारास चिंगी कांहीं कारणानिमित्त बाहेर आली, तेव्हां कृष्णंभट दिव्याजवळ बसले होते ते तिच्या नजरेला पडले आणि ती एकदम उद्गारली, "याच ब्राह्मणानें माझ्या आईचा हात धरला होता आणि यानेंच तिला ठार मारलं असावं" तिच्या या उद्गारामुळें सगळ्यांनाच चमत्कारिक झालं. कृष्णंभट ओरडूं व बरळूं लागले. सरला आणि इन्दूताई बाहेरचा गलका ऐकून काय प्रकार आहे तें पाहण्यास आल्या. क्षणार्धांत त्यांना खरा प्रकार समजला. "चिंगी म्हणते तें खरें असेल. माझ्यावर देखील या दुष्टाची वाईट नजर होती. इतके दिवस बोलल्यें नाहीं एवढेंच." असें सरला उद्गारली तेव्हां तर कृष्णंभटाच्या तोंडाला कांहीं सुमारच राहिला नाहीं. पुढचा हा प्रकार वर्णन करून करायचं आहे काय? विनायकरावांना इन्दूताईनें आणि मी हात धरून घरांत नेलें आणि लापशी औषधपाणी वगैरे देऊन झोंपण्यास सांगितलें. आतां ते झोपलेले आहेत.

या आजारांत सरलेचा, इन्दूताईचा आणि चिंगीचा जो स्वभाव मला कळून आला त्यावरून स्त्री-जातीबद्दल माझा आदर फार वाढला आहे. प्रत्येकीच्या गुणांचें मी कसें वर्णन करूं? बायका इतक्या गुण्यागोविंदानें राहतील अशी मला स्वप्नांत देखील कल्पना नव्हती. त्यांच्यामध्यें देखील खिळाडूपणा आहे म्हणावयाचा! बायकांमध्यें खिळाडूपणा असेल अशी मला कल्पना नव्हती. ज्ञानाची ऐट होती, पण पदोपदीं अज्ञानाचा प्रत्यय येत आहे!

आपला मित्र,

**नारायणराव पाठक**

## [ ५३ ] यांमध्यें भावनावश कोण नाहीं ?

पांचबावडी,
१५-१२-३३.

पतिनिष्ठ इन्दूचे पतिचरणीं सविनय नमस्कार. विनंति विशेष.

येथील हकीकत वारंवार लिहिण्याबद्दल बजावून सांगितलें आहे म्हणून ( आणि नारायणराव पाठक यांचेकडून कंत्राटबहाद्दर बादशहांकडे रोज खलिता जात असतो हें ठाऊक असलें तरी ) मी हें पत्र लिहीत आहें.

विनायकरावांची प्रकृति सुधारत आहे. चांगले उठतात-बसतात, चर्चा-वादविवाद करतात. पण अखेर थकतात आणि मग थकवा येऊन झोंपीं जातात !

सरलेनें पर्वां रात्रीं अंथरुणावर जवळ जवळ निजलों असतां मला रडविलें. मी सगळीं बिलें देऊन टाकलीं आणि बिस्किटें वगैरे सर्व सामान आणवत्यें हें तिच्या ध्यानांत आल्याशिवाय कसें राहील ? " इन्दूवहिनी, मी हे उपकार स्वीकारूं का नको हेंच मला समजत नाहीं " ती म्हणाली. पुढें तिच्यानें बोलवलें नाहीं आणि ती माझ्या अंगावर डोकें ठेवून घटका दीड घटका नुसती रडत व हुंदके देत राहिली. अखेर मोठा उसासा टाकून ती दूर झाली आणि एकटीच दोन घटका रडत राहिली. ती फारच हळुवार मनाची झाली आहे !

काल तिनें चिंगीशीं असंच केलं. " चिंगे, तूं मोठी झालीस तरी मी तुला रागावत्यें याबद्दल तुझी मी क्षमा मागत्यें " असं काय काय जी तिच्याशीं बोलत होती तें मला लिहितां येत नाहीं. सरला मला अतिशय विचारी, अल्प वयांतहि पोक्त आणि अतिशय बुद्धिप्रधान अशी वाटावयाची; पण पतीच्या काळजी करण्यासारख्या आजारामुळें तिला बिचारीला वेड्यासारखं झालं आहे. किंवा कदाचित् इतर बायकांप्रमाणेंच तीहि भावनाप्रधान असेल. " बायकांप्रमाणें " असें मी म्हटलें, पण विनायक-रावांसारखे पुरुष काय कमी भावनाप्रधान असतात ? बिचारे मधून मधून

ल्हानग्या छोटूची आणि छोटीची वारंवार आठवण काढून स्वतः रडतात आणि सरलेला रडवितात ! काल तर त्यांनीं कमालच केली. ते म्हणाले, "सरले, मला पाणी प्यायला माझ्या आईचं जाडं फुलपात्र देत जा, आणि आपल्या छोटूची कोट-टोपी आणि छोटीचं परकर-पोलकं समोरच्या खिळ्यांवर लावून ठेव, म्हणजे मला बरें वाटेल. मला जरी बरं वाटत आहे, तरी आईची आणि मुलांची आठवण वारंवार येते आणि यावीशी वाटते." सरलेनें बिचारीनें तें सर्व केलं, पण डोळे पुशीत कसें केलें असेल तें आपण कल्पनेनेंच जाणावें. आईबापांचें हृदय आईबापांनाच कळेल. आपल्या एवढ्याश्या छोटीची आठवण आपण नाहीं का नेहमीं काढीत ? मला आतां अधिक लिहितां येत नाहीं, म्हणून येथेंच थांबत्यें.

आपली पत्नी,

इन्दु

---

## [ ५४ ] तत्त्वप्रतिभेची स्फूर्ति

पांचबावडी,

१७–१२–३३

प्रियमित्र भाऊराव काळे यांस नारायणराव पाठक याचे नमस्कार.

आज जरा चमत्कारिक हकीकत कळवावयाची आहे.

दुपारीं पुरुषांचीं आणि बायकांचीं जेवणें आटोपल्यावर आम्ही सर्व मंडळी विनायकरावांजवळ गप्पागोष्टी बोलत होतों. सरला त्यांना डाळिंबाचे दाणे काढून देत होती, चिंगी मुसुंबी सोलून देत होती आणि इन्दु गांवांतून तिनें विनायकरावांच्या करमणुकीकरितां एक सतार आणली होती ती वाजवीत होती. मी वर्तमानपत्रें वाचीत होतों, आणि मधून मधून बातमी सांगत होतों. काळोबा बोरवणकरहि एक वर्तमानपत्र वाचीत होते. एका अस्पृश्याला तळ्यांत आंघोळ केल्याबद्दल गांवकऱ्यांनीं मरेमरेतों मारलें अशी बातमी वाचल्यावर त्यानें ती आम्हांला वाचून दाखविली आणि

"अस्पृश्यांचें हें नष्टचर्य केव्हां संपणार कोणास ठाऊक!" असें अर्धवट आपणांशींच आणि अर्धवट विनायकरावांना उद्देशून म्हटलें. विनायकराव म्हणाले, "संपेल, कांहीं दिवसांनीं संपेल. निराश होऊन कसं चालेल?" पुढें तेच म्हणाले "या सगळ्या गोष्टी एकदोघांच्या किंवा एकदोन जातींच्या हातांतल्या नाहींत. सबंध राष्ट्र म्हणजे ल्हानसहान का गोष्ट आहे? आणि आपलं राष्ट्र म्हणजे नांवाचं राष्ट्र. शेंकडा ९० बायकापुरुष अशिक्षित, जातिभेद, धार्मिक तंटे, संघटनेची आणि शिस्तीची संवय नाहीं, एक ना दोन, हजार भानगडी. त्यांत पुनः सत्ता परकीयांच्या हातांत. त्यांत पुनः भानगड अशी उत्पन्न झाली आहे कीं हे सत्ताधीश स्वतःच जगाच्या आर्थिक भोंवऱ्यांत सांपडलेले. युद्धाची त्यांना भीति. त्यांच्या देशांत पुनः क्रान्तिकारकांची त्यांना भीति आहेच. जग सगळं महान् वातचक्रांत सांपडलेलं, त्यांत जित, अशिक्षित, बावळे, भांडखोर, असे जे आपण त्यांचा काय निभाव लागणार? जिकडे वातचक्र नेईल तिकडे आपण जायचं, हेंच आपल्या नशिबीं."

"म्हणजे तुम्ही निराशावादी दिसतां" काळोपंत म्हणाले.

"नाहीं, मुळींच नाहीं. उलट माझा आशावाद असा आहे कीं त्याला कधींच बाधा यायची नाहीं. मी असं म्हणणारा आहें कीं आपलं कर्तव्यकर्म आपणांला दिसेल तें करीत जावं. फलाची, नफ्यातोट्याची आणि भविष्य-काळची फारशी काळजीच करूं नये."

"भविष्यकाळच्या फळाकडे पाहिल्याशिवाय चालेल कसं?" मी म्हटलं, तेव्हां ते हंसून म्हणाले, "पहा बिचारे. पण जवळचाच भविष्यकाळ पाहूं नका. अगदीं लांबचा भविष्यकाळ पाहिलात म्हणजे आपलं राष्ट्र आणि आपली संस्कृति–आपलंच राष्ट्र आणि आपलीच संस्कृति कशाला?–सगळींच राष्ट्रं आणि सगळ्यांच्याच संस्कृति लयाला जायच्या आहेत! इजिप्शियन्, खाल्डिअन्, सुमेरिअन्, संस्कृतींचें जें झालें तेंच पुष्कळ कालावधीनंतर आपल्या संस्कृतीचें व्हावयाचें आहे, असें इतिहास तरी सांगतो.

राष्ट्रांचंच कशाला? सबंध विश्व थंड गोळ्याप्रमाणें व्हावयाचं आहे, असं पदार्थविज्ञानशास्त्र सांगतं. आणि ज्योतिःशास्त्रहि म्हणतं कीं सबंध अणुपरमाणु यांची प्रचण्ड घडामोड पुढें व्हावयाची असून त्या जगत्प्रलयांत पूर्वीचें कांहीं एक टिकावयाचें नाहीं! तेव्हां भविष्यकाळाविषयीं फारसा विचारच करूं नये. आपलं शुद्ध मन आपल्याला जें कर्तव्य म्ह न सांगतं तें करावं. तें नेहमीं करीत राहण्यांत जो आनंद तो खरा आनंद. तोच नित्य शाश्वत आनंद, तेंच निःश्रेयस सुख, तोच स्वर्ग आणि तेंच आत्म्याचें अमरत्व. अमरत्व हें कालाच्या मापानें न मोजतां सात्विक आनंदाच्या मानानें मोजावयाचें आहे. हें अमरत्व नित्य कर्तव्यकर्म करीत राहिल्यानें ज्याला प्राप्त झालें तो निर्भय झाला आणि स्वतंत्रहि झाला. तोच जीवन्मुक्त म्हणावयाचा."

अंगांत तत्त्वप्रतिभेची स्फूर्ति जणूं कांहीं झाल्यामुळें विनायकराव असें बोलत असतां एक पोलीस नाईक तेथें आला आणि फौजदारसाहेबांनीं विनायकराव भोळे कोणी आहेत त्यांना ताबडतोब ठाण्यावर बोलावलें आहे असें म्हणाला. विनायकरावांनीं त्याला पुष्कळ समजावून सांगितलें कीं मी अशक्त आणि आजारी आहें, मला चालवत नाहीं, बैलगाडी आणवलीत तर मी येतों, पण तो नाईक कोठलें ऐकायला? तो आपला आतांच चला असा तगादा लावूं लागला आणि जबरदस्तीची भाषा बोलूं लागला. विनायकराव संतापून "येत नाहीं जा" असें म्हणून सत्याग्रह करण्याच्या बेतांत होते इतक्यांत मी तेथें सहजगत्या बैलगाडी आलेली आहे असें पाहून ती थांबविली आणि त्यांत गादी वगैरे पसरून विनायकरावांना घेऊन चौकीवर गेलों. तेथें फौजदारांना झालेला प्रकार सर्व सांगितला तेव्हां "मूर्ख आहेत हे लोक" असें (तोंडदेखलें म्हणा किंवा मनापासून म्हणा) आम्हांस सांगून फौजदारसाहेबांनीं विनायकराव भोळे यांचेबद्दल रिपोर्ट करण्याबद्दल आम्हांला हुकूम आला आहे असें म्हटलें आणि कांहीं जबाब घेऊन आम्हांला परत लावून दिलें. गांवाबाहेर जावयाचें नाहीं हा हुकूम रद्द करण्याच्या हेतूनें ही चौकशी आहे, का रोजच्या हजेरीचें लचांड

पाठीमागें लावण्याइतकी प्रकृति सुधारली आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां ही चौकशी आहे, कांहीं समजत नाहीं.

घरीं आल्यावर थकव्यामुळें आणि मनांतल्या खळबळीमुळें विनायकरावांना ताप आला. आतां ते झोंपीं गेलेले आहेत. माझेंहि कपाळ दुखत आहे आणि ताप येणार असा रंग आहे. ताप आल्यास एकदोन दिवस पत्र लिहिणार नाहीं.

सरलेलाहि ताप आला असावा असें इंदूवहिनींच्या बोलण्यावरून दिसतें. पण ती तशीच 'कांहीं नाहीं कांहीं नाहीं' म्हणत काम करीत असते. अंथरुणावर पडेल तेव्हां समजेल. पण तिला तरी मी कसा दोष देऊं ?

आपला मित्र,
**नारायण पाठक**

---

## [५५] "To understand—all is to pardon all"

पांचबावडी,
१९-१२-३३

प्रियमित्र भाऊराव काळे यांस नारायणराव पाठक याचे नमस्कार वि. वि.

आज सकाळीं मला ओकारी येऊन पित्त पडलें, हुडहुडी भरली आणि मलेरिआचें कपाळ दुखणें वगैरे सगळे प्रकार झाले. विनायकरावांजवळच आंथरुण घातलेलें आहे. घाम येऊन ताप निघाला आहे आणि आतां थोडें बरें वाटत आहे म्हणून (आणि आपल्याला वचन दिलें आहे तें स्मरून) हें पत्र लिहीत आहें.

दुपारचीं जेवणें झाल्यावर गप्पागोष्टी बोलत असतां काळोबांनीं कृष्णंभटादि ब्राह्मण आणि पोलिसलोक यांना (थोड्याशा ग्राम्य भाषेंत) दोष दिला तेव्हां विनायकराव म्हणाले, "कृष्णंभट एक

वाईट असला म्हणून सगळे ब्राह्मण वाईट नाहींत. तुम्ही कृष्णंभटाकडेच पाहतां. पण पांडुरंगशास्त्री अभ्यंकर, नारायणराव काणे यांच्यासारख्या पवित्र ब्राह्मणांकडे कां पहात नाहीं ? तसंच पोलिसांना तरी कशाला दोष लावावा ? त्यांचं शिक्षण, त्यांच्या घरचं वळण, त्यांच्या सोबत्यांचं वर्तन—यांचा विचार करा म्हणजे त्यांचा फारसा दोष नाहीं असं तुम्हांलाच दिसून येईल. "

" असं पाह्यला लागलों तर मग जगांत कोणालाच दोष द्यायला नको ! " सरला म्हणाली. तेव्हां विनायकराव म्हणाले " हो, बरोबर आहे तुझं म्हणणं. (" टु अंडरस्टॅन्ड ऑल् इज टु पार्डन ऑल् ") " सगळं ज्याला समजलं तो सगळं क्षम्य समजतो " अशी एक म्हण आहे ती ध्यानांत ठेव. "

" म्हणी किती ध्यानांत ठेवल्या तरी वाईट तें केव्हांहि वाईटच " सरला पुनः म्हणाली. तेव्हां ते म्हणाले, " तुला अजून तें समजायचं नाहीं. तुझा दोष नाहीं, तुझा अनुभवच कमी आहे."

असें त्यांनीं म्हटल्यावर बोलणें कांहीं वेळ थांबलें आणि चिंगी, इंदुताई, सरला वगैरे बायका आणि काळोबा व मी वर्तमानपत्रें वाचीत इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत राहिलों. विनायकराव गोष्टी ऐकतच राहिले. त्यांना झोंप लागली तेव्हां आम्ही गप्पा बंद केल्या. मी थोडीशी डुलकी घेतली आणि बायका घरांत कामाला गेल्या. कळावें.

आपला मित्र,

**नारायणराव पाठक**

---

## [५६] स्वधर्म

पांचबावडी,

२३-१२-३३

प्रियपतीचे चरणीं इंदूचे नमस्कार वि. वि.

इतके दिवस आम्ही बायका गुण्यागोविन्दानें वागलों, पण आज

आमच्या स्वभावाप्रमाणें (किंवा माझ्याच दोषामुळें) पुनः थोडीशी तेढ उत्पन्न झाली आहे. निमित्त एवढेंच कीं मी चिंगीनें सैंपाकांत फार ढवळाढवळ करूं नये, ती ओंगळ दिसते, ती पदार्थ बिघडवते, असं सरलावन्संजवळ म्हणाल्यें. त्या म्हणाल्या कीं "तिला आपण असं सांगितलं तर तें 'त्यांना" पसंत पडणार नाहीं, आणि रागावून डोकं संतापून घेतील आणि मला बोलतील." मी म्हटलं कीं चिंगीचा मी विटाळ मानीत नाहीं, पण कांहीं म्हटलं तरी पूर्वसंस्कारामुळें मला ती ओंगळ दिसते, तिनें सैंपाकाला हात लावूं नये, बाहेरचं काम करावं. यांत रागवायला काय झालें?" वन्सं म्हणाल्या कीं "मी आपलं त्यांचं मत सांगितलं. तुम्हांला योग्य वाटेल तें तुम्ही करा. मी कांहीं तिला अमुक कर आणि तमुक करूं नको असं सांगणार नाहीं." वन्संचं हें म्हणणं सरळ होतं, पण मला तें लागलं. त्यांच्यावरचा माझा राग चिंगीवर निघाला. आणि तिला मी तूं हात धूत नाहींस, स्वच्छ नसतेस, वगैरे कांहीं लागून बोलल्यें. त्यामुळें तीहि माझ्यावर रागावलेली आहे. माझा दोष मला दिसतो, पण माझ्या स्वभावाला औषध काय? लवकरच दोघींची समजूत घाल्त्यें.

आज नारायणराव पाठक शेजारच्या पाटघर नांवाच्या गांवीं गेले आहेत. तेथें कोणी इनामदार आहेत त्यांचेकडे कांहीं जुने कागदपत्र मिळण्याचा संभव आहे, असें कळलें मात्र, लगेच स्वारी काल अंगांत ताप होता वगैरे सगळ्या गोष्टी विसरून, चालत त्या गांवीं गेली. उद्यां परत येतील असें वाटतें.

आज दुपारची सविस्तर हकीकत नारायणराव पाठक लिहितात त्याप्रमाणें लिहिण्याचा प्रयत्न करत्यें, पण, तो साधेल असें वाटत नाहीं.

पोलिसांकडून पुनः एक मनुष्य साध्या ड्रेसमध्येंच आला होता. त्यानें माझी, चिंगीची, नारायणराव पाठकांची वगैरे अरेरावीनें आणि उर्मटपणानें प्रश्न विचारून चौकशी केली. विनायकराव रागानें भडकणार होते, पण

त्यांनीं विवेक करून राग गिळला. तो गेल्यावर एवढंच म्हणाले कीं "बिचारे अज्ञान आहेत, त्यांच्यावर रागावण्यापेक्षां त्यांची कींव करावी झालं." पोटांत मात्र त्यांच्या राग ढवळाढवळ करीत असावा !

दुपारीं चहा घेतांना विनायकरावांनीं काळोबा बोरवणकरांशीं बोलतांना जे कांहीं विचार सांगितले ते मला चांगले सांगतां येणार नाहींत. पण ते फार उच्च होते आणि ऐकतांना फार मौज वाटली. आपला समाज बिघडला आहे, जगाची सामाजिक घटनाच चुकीची झालेली आहे म्हणून मनुष्याला आपली सर्वांगीण उन्नति करून घेतां येत नाहीं असा त्यांच्या म्हणण्याचा रोख होता. मनुष्यामध्यें हरतऱ्हेच्या वासना, सहजप्रेरणा, आवडी-निवडी, आकांक्षा वगैरे आहेत, पण समाजरचनेमुळें सगळ्यांची यथायोग्य एकवाक्यता होत नाहीं, एखाद दुसऱ्या अंगालाच भलतेंच महत्त्व येऊन स्वभाव "एकारतो आणि बेढब होतो" असें ते म्हणाले. मनुष्याला सगळं कांहीं पाहिजे आहे. त्याला नीति पाहिजे, कलाहि पाहिजे; द्रव्य पाहिजे; मानसन्मानहि पाहिजे. स्वार्थीपणा त्याच्यांत आहे, परोपकार बुद्धीहि आहे; भोग पाहिजे, त्यागहि पाहिजे; तात्पर्य मनुष्याचें कोणत्याहि एका गोष्टीनें पूर्ण समाधान व्हावयाचें नाहीं. त्याला द्रव्य पाहिजे, अधिकार पाहिजे, बायकोचें सुख पाहिजे, मुलेंबाळें पाहिजेत, आणि ज्ञान, देशभक्ति, कलोपासना वगैरेहि पाहिजेत. या सगळ्या वासनांची तृप्ति होणें सध्यांच्या समाजांत शक्य नाहीं, म्हणून त्याला कांहीं वासनांची लपवा-छपवी करावी लागते, कांहींची मुस्कटदाबी करावी लागते, कांहीं दाबून दडपून ठेवाव्या लागतात आणि कांहीं वासना माराव्या लागतात, पण वासना कधींच पुरत्या मरत नाहींत. त्यांची फार तर मुस्कटदाबी आपण करूं शकूं, आणि पोटांत त्यांना कोंडून ठेवूं. पण वेताच्या पेटाऱ्यांत ठेवलेल्या सापांप्रमाणें संधि सांपडतांच या वासना फणा बाहेर काढतात ! जगांतलीं दुःखें कांहीं वासना ( वाईट तशा चांगल्या वासना— ) दाबाव्या किंवा बाह्यतः तरी माराव्या लागल्यामुळें उत्पन्न झालीं आहेत. समाजघटना सुधारल्याशिवाय वासनांची घातुक मुस्कटदाबी, चेपाचेपी, लपवालपवी, चेंगराचेंगरी

थांबावयाची नाहीं आणि पूर्ण सुख कधीं मिळावयाचं नाहीं. तोंपर्यंत कोणी केवळ नीतीचे उपासक, कोणी केवळ कलेचे उपासक, कोणी त्याग करणारे, कोणी भोग उपभोगणारे; कोणी ज्ञानाच्या पाठीमागें, कोणी द्रव्याच्या पाठीमागें; कोणी राजकारणी, कोणी समाजसुधारक; कोणी सीतासावित्रींचीं स्तुतिस्तोत्रं जपणारे तर कोणी घटस्फोट आणि कंत्राटी लग्नं मागणारे;–असे एकांगी एकारलेले, बेढब, विद्रूप, असमाधानी, दुःखी कष्टी लोक दिसावयाचे ! अशा स्थितींत ज्यानें त्यानें आपल्या शरीर-प्रकृतीला मानवेल, मनःप्रकृतीला आवडेल, आर्थिक परिस्थितीला जुळेल, भावनांना रुचेल, मताला पटेल, असा एखादा मार्ग स्वीकारावा आणि तोच आपला 'स्व-धर्म' मानून त्यांत रममाण व्हावें. आपला हा 'स्व-धर्म' इतरांनाहि 'स्व-धर्म' वाटलाच पाहिजे, असा आग्रह धरण्यांत अर्थ नाहीं. प्रत्येक जण आपआपला 'स्व-धर्म' आचरूं लागला आणि इतरांच्या स्वधर्मांत ढवळाढवळ करण्याचें किंवा त्याची निंदा-नालस्ती करण्याचें टाळूं लागला तर जगांतलीं निम्याहून अधिक भांडणें कमी होतील, असें त्यांनीं शेवटीं सांगितलें.

काळोबा बोरवणकरांनीं व आम्ही मधून मधून विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देतांना त्यांनीं हें सगळं सांगितलं, पण मला सारांश जो आठवला तो (आपणांला सगळ्या गोष्टी कळाव्याशा वाटतात म्हणून) कळविला आहे.

आमचं हें अशा प्रकारचं बोलणं संपत आलं तेव्हां फौजदारसाहेबांकडून पुनः एकदां एक शिपाई आला आणि विनायकरावांना गाडींत घालून चौकीवर ताबडतोब घेऊन या असें सांगून गेला. विनायकराव मनांत चरफडले, पण गाडी करवून चौकीवर गेले आणि आले ते अंगांत चांगला ताप भरलेला. आतां ताप उतरला आहे. पण पोलिसांकडच्या या खेळांनीं दुखणें उलटतें कीं काय अशी भीति वाटते. कळावें.

आपली पत्नी,

**इन्दु काळे**

---

## [५७] आशालतेचें उन्मूलन

साखरपें.

४-१-३४

प्रियमित्र भाऊराव काळे यांस नारायण पाठक, मुक्काम साखरपें याचा सा. न. वि. वि.

विनायकरावांची प्रकृति अलिकडे आठ दहा दिवस चांगली सुधारूं लागली आहे, जपलें पाहिजे पण काळजी करण्याचें कारण नाहीं, हें मी पांचबावडीहून मागें कळविलें आहेच. प्रकृति बरीच सुधारली आहे, काळजी करूं नये. मी येथें साखरप्यास येण्याचें कारण असें:—

मला चार दिवसांपूर्वी काशी ढवळे हिच्या आईचें पत्र आलें कीं सवडीनुसार भेटून जावें. आजाराचा उल्लेख नव्हता, व अलिकडे तिची प्रकृति सुधारत चालल्याचें मी ऐकलें होतें, म्हणून तिनें कशाला मुद्दाम बोलाविलें असा प्रश्न पडला. लग्नाविषयींचा अखेरचा प्रयत्न करून पहावा असें तर तिला वाटत नाहींना अशी शंका आली व तीच खरी असावी असें विनायकरावांनाहि वाटलें. विनायकरावांनींच पत्र लिहून भेटीचा हा योग जुळवून आणला असावा असा मी अंदाज केला. त्यांची प्रकृति बरी होती म्हणून मी तिकडे जाण्याकरितां निघालों. जातांना विनायकरावांनीं सांगितलें कीं "आतां तिला आपलें मन सांगून टाक. मी आजारी आहें, म्हणून तिला तूं प्रेमाचं पत्र लिहिण्यास कांकूं केलेंस, पण आतां जात आहेस तर मित्र मृत्युशय्येवर असतांना असल्या गोष्टी कशा बोलाव्यात असले विचार येऊं देऊं नकोस." मीहि तसाच बेत केला होता. आणि पुढील मनोराज्यें करीत होतों. मधून मधून ती अत्यवस्थ आहे कीं काय अशी भीति वाटे, पण ती फार वेळ टिकत नसे. पुनः मनोराज्यें सुरू होत !

साखरपें जवळ जवळ येत चाललें व उजाडण्याचा सुमार झाला तेव्हां मी बैलगाडींतून उतरून चालूं लागलों. मनांत विचार आला कीं आपल्या

नीरस कष्टमय आयुष्याचीहि रात्र सरली व आनंदमय संसाराचा सूर्योदय लवकर होणार. पूर्व दिशेचें मुख किंचित् लालसर झालें होतें व सभोंवार अंधार होता तो पाहून मनांत म्हटलें कीं सुमुखी काशी ढवळे काळी चंद्रकळा नेसून आपलें स्वागत करण्यास आली तर तीहि अशीच दिसेल ! गाईचीं गोजिरवाणीं वासरें पाहून आपणांस मुलें होऊन गाईच्या वात्सल्यसुखाचा आपणांस कधीं अनुभव येईल काय अशी कल्पना मनांत आली. पक्ष्यांचा किलबिलाट ऐकून पुढें मागें घरांतल्या मुलांबाळांचा गोंगाट असाच आल्हाददायक होईल काय असा विचार मनांत डोकावला. वाऱ्याची झुळूक आली तेव्हां क्षणभर भास झाला कीं वारादेखील सहानुभूतीनें काशी ढवळेकडे जाण्यास आपणांस प्रोत्साहन देत आहे. फुलांचा सुवास आगामी सुखाची नुसती चुणूक दाखवीत आहे असा भ्रम झाला. पण रस्त्याच्या बाजूच्या एका खड्ड्यांत पाय थोडासा मुरगळला आणि कांटा बोचला तेव्हां लगेच शुद्धीवर आलों !

मनांत अशा तऱ्हेचे अनेकविध सुखदुःखात्मक विचार घोळत असतां मी काशी ढवळे हिच्या घरीं गेलों व ओटीवर बसलों तेव्हांच मला खरा प्रकार अजमावतां आला. कारण, कोठून केव्हां निघालांत वगैरे मामुली प्रश्न विचारण्यापलीकडे कोणीच कांहीं माझ्याशीं बोलेना. पाय धुण्यास पाणी आणून ठेविलें होतें त्यानें पाय धुवून "आतां उकडत आहे, अंघोळ करून येतों" असें मी घरांत प्रवेश मिळावा म्हणून म्हटलें. अंघोळ करण्याकरितां मागील दारीं जाऊं लागलों तेव्हां काशीची आई रडत असलेली दिसली. मी कशीबशी अंघोळ केली, आणि कोंकणच्या पद्धतीला अनुसरून चार आचमनें घेऊन गंध लावलें. तरी देखील कोणी कांहीं थांग लागूं देईना ! प्रत्येकजण कांहीं तरी क्षुल्लक गोष्टीबद्दल बोले. चहा पाणी झाल्यावर मला काशीच्या आईनें काशी आजारी आहे, तिच्याकडे चला पाहिजे तर, असें म्हटलें आणि मी अर्थात् उत्कंठेनें तिच्या पाठोपाठ चालूं लागलों. काशी अंथरुणावर पडून माझी जणूं कांहीं वाटच पाहात होती असें तिच्या चर्येवरून दिसलें. तिच्या आईनें तिच्या पाठोपाठ आलेल्या मुलांना

बाहेर जाण्यास सांगितलें आणि ती आपणहि कांहीं तरी निमित्त करून सैंपाकघराकडे गेली. मी काशीजवळ गेलों व हात धरून ताप कितपत आहे हें पाहिलें आणि डॉक्टर कोण आहे, किती दिवस ताप येत आहे, वगैरे आजाराबद्दलच्या इकडच्या तिकडच्या मामुली चौकश्या दोन तीन मिनिटें केल्या. नंतर कांपत कांपत म्हटलें, " माझें मन आतां बदललें आहे, मी लग्नाला तयार आहें." "आतां काय उपयोग ?" ती म्हणाली. " कां, उपयोग कां नाहीं ? तूं बरी होशील लवकर." असें मी म्हटलें, पण मी खोटें बोलत आहें असें माझें मलाच वाटलें; कारण ती जरी चांगलें बोलत होती तरी तिच्या चेहऱ्यावर अर्धवट प्रेतकळा आली होती हें मला स्पष्ट दिसत होतें. " मला क्षमा कर " असें मी म्हटल्यावर तिला आणि मला दोघांनाहि रडूं कोसळलें. थोडक्याच अवधींत शोकाचा आवेग आवरून ती म्हणाली, " आपण केलेंत तेंच योग्य केलेंत. ध्येयापुढें प्रेमाची मातब्बरी नसावी. आपण असे ध्येयनिष्ठ आहांत म्हणूनच माझी प्रेमाची एकनिष्ठता कायम राहिली. " पुढें आम्हीं असेंच कांहीं तरी बोलत राहिलों. त्यांतलीं एकदोन वाक्यें सांगतों, कारण तीं कानांत घुमत आहेत. तीं अशीं:—" पण बायका ध्येयाच्या आड येतील असें तुम्हीं मानतां कोणत्या आधारावर ? सरलावहिनी ध्येयाच्या आड आल्या का ? "

माझ्या येण्यानें काशीची प्रकृति तीनचार दिवसांत चांगली सुधारूं लागली. तिच्या आईला हें पाहून फार आनंद झाला. माझें मतान्तर तिला काशीकडून आलों त्या दिवशींच कळलें होतें, म्हणून तिला माझे-बद्दल आपलेपणा वाढूं लागला आणि आमच्या आशांना पालवी येऊं लागली. परंतु.........दोन दिवसांनंतरच आशावृक्ष जळून गेले. .........असो. मी लवकरच पांचबावडीला जाईन. विनायकरावांना ही गोष्ट न सांगण्याचा मी प्रयत्न करीन; पण माझ्या चेहऱ्यावरून ते सर्व ओळखतील असें वाटतें. त्यांना माझ्यापेक्षांहि वाईट वाटेल !

तिकडे गेल्यावर पत्र पाठवीनच.

**नारायण पाठक**

---

## [ ५८ ] पत्रांतलें पत्र

पांचबावडी,
१–७–३४.

प्रियमित्र भाऊराव काळे यांस, नारायण पाठक मुक्काम पांचबावडी याचे नमस्कार वि. वि.

मी येथें आल्यावर माझ्या चेहऱ्यावरून आणि मी लपवूं पाहत असलेल्या अश्रुबिन्दूंवरून विनायकरावांनीं साखरप्याची बहुतेक सगळी हकीकत ताडलीच. हळूहळू त्यांना एकंदर सविस्तर हकीकत सांगितल्याशिवाय मला राहवेना. त्यांचे प्रश्नच असे असत आणि विचारण्याची रीतच अशी असे, कीं अगदीं क्षुल्लक देखील गोष्ट मला त्यांच्यापासून लपवितां आली नाहीं. सुदैवानें त्या दिवशीं तरी वाईट परिणाम कांहीं झाला नाहीं.

आज मी सामान आणण्याकरितां बाजारांत गेलों होतों. बायकामंडळी सैंपाकघरांत होती. अशा वेळीं पोस्टमनानें विनायकरावांना एक पत्र आणून दिलें. त्यांनीं तें पत्र वाचून पाहिलें आणि "इन्दूवहिनी, इन्दूवहिनी इकडे या, आनंदाची गोष्ट आहे" असें मोठ्यानें बोलत ते सैंपाकघरांत घाईघाईनें गेले. मानसिक कारणांमुळें म्हणा किंवा हे शारीरिक श्रम देखील सोसले नाहींत म्हणून म्हणा, त्यांना लगेच घेरी आली. लवकरच ते सावध झाले. आतां ते चांगले बोलत आहेत, आणि आपल्या आततायीपणाच्या वर्तनाला दोष देत आहेत.

पत्र पुढें दिल्याप्रमाणें होतें:—

### पश्चात्ताप व पापक्षालन

रा. रा. विनायकराव भोळे यांस बिन्दुमाधव म्हस्कर यांचा नमस्कार वि. वि.

मी करूं नये तें पाप करण्यास प्रवृत्त झालों. आतां मला इतका पश्चात्ताप झाला आहे, कीं मी विष घातलेला एक पेढा खाल्ला आहे. हें पत्र मी पहांटेस उठून शांतपणें लिहीत आहें. लिहून झाल्यावर एका घटकेनें देवळांत हळूच पळून जाईन व देवाला शरण जाऊन त्याचे चरणीं प्राण अर्पण करीन.

मी मूळचा वाईट नव्हतों. माझे वडील सच्छील असे हरदास होते. त्यांचे पासून मी गाणें-बजावणें, सभाधीटपणा, हजरजबाबीपणा, वगैरे शिकलों. शील मात्र घेण्याचें विसरलों. लहानपणींच मला वाईट संगत लागली आणि बायकांना कांहीं एक चारित्र्य नसतें वगैरे कुकल्पना खेड्यांतल्या लोकांपासून मी उचलल्या. जरा मोठा झाल्यावर मला दोन-चारदां नायकिणींशीं वगैरे संबंध येऊन स्वानुभवहि असाच आला आणि म्हणून सौ. इन्दुबाई काळे या देखील अशाच असतील असें वाटलें. प्रयत्न करून एकदा अपयश आलें तरी पुनः कसून प्रयत्न केल्यास तिच्या बाबतींत देखील यश येईल असें वाटूं लागलें. माझा कोणी संशय घेऊं नये म्हणून नारायणराव पाठकांशीं व आपल्याशींहि त्याचा संबंध आहे अशा अर्थाचीं निनांवी पत्रें मी पाठविलीं. पण तुम्हां दोघांचा संशय कोणीच घेईना. इन्दुताईचें मन वळविण्याचे संभावितपणाचे अप्रत्यक्ष प्रयत्न पुष्कळ करून पाहिले तरी यश येण्याचें चिन्ह दिसेना म्हणून कपटहरण करण्याचें योजलें. माझ्यावर संशय येऊं नये म्हणून नारायणराव पाठकांनीं तिला पळवून नेली अशी खोटी तार तुमचेकडे पाठविली. इन्दुताईंना एक लोणकडी थाप देऊन मोटारींत घालून साताऱ्याकडे मोटर भरधांव फेंकण्यास साथीदार असलेल्या ड्रायव्हरला सांगितलें. वाटेंत तिच्याशीं लघळपणा करण्याचा प्रयत्न केला, पण थोबाड फुटल्यामुळें निराशा झाली व ही ब्याद वाटेंत सोडून आपण फरारी व्हावें असा बेत केला. नारायणराव पाठक आंबेवाडी या गांवीं शिलालेखाचें संशोधन करण्यास गेले आहेत हें त्यांच्याशीं झालेल्या संभाषणावरून मला ठाऊक होतें; व इन्दुताईशीं बस्तान न जुळल्यास मोटर तेथें नेऊन इन्दुताईंना तेथें सोडावें व आपण फरारी व्हावें अशी अगोदरपासूनच योजना केली होती. सुदैवानें ते

तेथें भेटले. इन्दुताईंना तेथें सोडून मी मोटर पुनः पुण्याकडे वळविली व पुण्यास एक महिना राहिलों. पुढें अनेक ठिकाणीं दडून राहात होतों. दडून राहण्याचा अखेर कंटाळा आला. पैसे संपले. स्नेही म्हणविणाऱ्यांकडून अपमान होऊं लागले. पोलिसांच्या ताब्यांत जाण्याची भीति वाटूं लागली. माझे हाल कुत्रा खाईना. मनहि पश्चात्तापदग्ध होऊं लागलें. वेड लागण्याची पाळी आली. अखेर मनाचा निश्चय केला कीं तुरुंगांत जाऊन मरेतों काम करीत बसण्यापेक्षां विष खाऊन जीव द्यावा. त्याप्रमाणें मी आज एका पेढ्यांत विष घालून ठेवलें होतें तो पेढा खाल्ला. एक तासानें त्याचा अंमल सुरू होईल. तेवढ्या अवधींत हें पत्र संपवून तें पोष्टांत टाकतों. पहाटेचा एक वाजून गेला आहे तेव्हां काळोखांत मला कोणी ओळखूं शकणार नाहीं. पत्र टाकून झाल्यावर वाटेंत कोणी भेटणार नाहीं व भेटल्यास देवळांत जाऊन लहानपणीं माझे वडील ज्या देवासमोर कीर्तनें करीत असत त्या देवावर माझी विशेष श्रद्धा आहे म्हणून त्याच्या चरणाजवळ जाईन, व पूज्यतम वडिलांचें स्मरण करून व त्यांची क्षमा मागून मी आपले प्राण सोडीन.

शेवटीं तुम्हांला एक गोष्ट सांगावयाची आहे. ती तुम्ही भाऊराव काळे यांना सांगावी. इन्दुबाई या अत्यन्त शुद्ध अंतःकरणाच्या आहेत. त्यांचे शीलाबद्दल कांहींहि संशय घेऊं नये. खोटें बोलून मला आतां कांहीं एक मिळवावयाचें नाहीं. पश्चात्तापदग्ध होऊन मृत्यूला कवटाळणाऱ्या आणि आपल्या पापांचें क्षालन करूं पाहणाऱ्याचे हे शब्द आहेत, त्यांवर निःशंक विश्वास ठेवावा.

आंबेवाडी
५-१-३४

बिन्दुमाधव म्हस्कर

सदर पत्र तुमच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे म्हणून अक्षरशः नक्कल करून, रुजू करून घेऊन पाठविली आहे. अस्सल पत्र पोष्टांत

कदाचित् गहाळ होईल म्हणून ठेवलें आहे. तें पुण्यास स्वाधीन करीन. कळावें.

**नारायण पाठक**

---

## [ ५९ ] अंतर्मनाची खळबळ, धडपड, बडबड.

पांचबावडी,
१२–१–३४.

प्रियमित्र भाऊराव काळे यांस सा. न. वि. वि.

आज जरा विनायकरावांच्या बाबतींत चिन्ताजनक बातमी लिहावयाची आहे. किंवा आतां चिन्ता करण्याचें कारणच नाहीं, असेंच म्हणावें झालें! सविस्तर हकीकत अशी:—

मी बाहेर सचिन्त बसलों असतां "विनायकराव तुम्हांला बोलावीत आहेत" असें मला कोणीसें सांगितलें. मी आंत त्यांच्यापाशीं गेलों आणि तोंड पुढें करून हाताच्या चिन्हानें आणि तोंडानें "काय पाहिजे" म्हणून विचारलें. ते म्हणाले, "नारायणराव, तुमचा अज्ञेयवाद खोटा मी ब्रह्माशीं तादात्म्य पावलों आहें, एकजीव झालों आहें, समरस झालों आहें." हा वायूचा झटका आहे हें मी ओळखलें आणि म्हटलें, "बरं उद्यां बोलूं आपण. आतां पडा." "नाहीं, नाहीं, पडायचं काय म्हणून? मी ब्रह्मप्रवाहाबरोबर हंसासारखा वाहत आहें, सतारीच्या तारांप्रमाणें सृष्टीच्या तारांशीं माझ्या ध्वनीचा मिलाफ झाला आहे." "बरं, बरं. सगळं चांगलं आहे. पण आतां निजा." मी कठोर आवाजानें म्हटलें.

"मी तुमचं ऐकणार नाहीं. मला वायू झाला आहे असं तुम्हांला वाटतं. सरलेनें सांगितलं तर मी निजेन." असें म्हणून त्यांनीं सरलेकडे पाहिलें आणि ती त्यांचेजवळ जाऊन "निजावं आतां जरा. झोंप आली

म्हणजे बरं वाटेल." असें म्हणाली तेव्हां त्यांना काव्याचा क्षणभर झटका आला आणि ते बडबडूं लागले.

**सरला असे सरला। ऐशी पत्नी विरला॥**
**सरला माझी माता। सरला माझा पिता॥**
**सरला माझा गुरु। सरला माझा—**

यमक आठवत नाहीं, काय करावं! आतांपर्यंत कधीं काव्य केलं नाहीं, आतां कुठलं येणार?

"आतां अगदीं गप्प बसावं." सरला आतां कठोर आवाजानें म्हणाली. त्याबरोबर स्वारी एकदम थांबली. क्षणार्धांत पुन्हां बडबडूं लागले—" मौनं सर्वार्थसाधनम्." आतां अगदीं गप्प बसतों. बोलायचं आहे काय? आणि बोलणार कसं? **यतो वाचो निवर्तन्ते......**

—अशी आणि याहून विलक्षण आणि विसंगत बडबड कांहीं वेळ झाल्यावर थकवा येऊन विनायकराव निजले. आम्ही तेथेंच बसून राहिलों होतों. घटकाभरानें त्यांनीं सरलेला खुणेनें जवळ बोलावलें आणि तिच्या कानांत खोल आवाजानें "मुलीकरितां-मोफत-शाळा काढ-" असं कायसंसं पुटपुटले आणि पांचएक मिनिटें गुंगींतली घशाची घरघर चालून एकदोन उचक्या येऊन जें व्हायचं तें झालं!

**नारायण पाठक**

---

## [ ६० ] देशभक्त मेला, शाळेला सुटी.

पुणें,
१६-१-३४.

प्रियमित्र भाऊराव काळे, मुक्काम सुरत यास नारायणराव पाठक मुक्काम पुणें याचा नमस्कार वि. वि.

जरूरीच्या कामाकरितां आपण सुरतेस गेल्याचें येथें आल्यावर कळलें, म्हणून आपला तेथला पत्ता विचारून घेऊन त्या पत्त्यावर पत्र धाडीत

आहें. आतां पांचबावडी येथील शेवटल्या दिवसाचीच हकीकत राहिली आहे !

सरलेनें तिसऱ्या दिवशींच कागदपत्रें आणि भांडीं कुंडीं यांची आवरा-आवर धीरोदात्तपणें केली आणि "उद्यां पहांटे ५ वाजतां निघणाऱ्या मोटारलॉरीनें पुण्यास जाण्याचा आपला निश्चय झाल्याचें सांगितलें. रदबदलीदाखल बोलण्याला त्यांनीं अवकाशच कांहीं ठेवला नाहीं, इतका त्यांचा आवाज निर्धाराचा होता. एका स्पेशल मोटारीनें आपण सर्वजण जाऊं अशी उपसूचना मात्र आम्हीं करूं शकलों आणि सरलाबाईंनीं ती मान्य केली.

डॉक्टर-वैद्य, औषध-पाणी, दूधवाला, वाणी वगैरेंचें बिल आपण देऊन ठेविलेल्या पैशांतून देऊन टाकलें होतें तेव्हां मागें कांहीं ओढ नव्हती आणि आम्ही पहांटेस ४–४॥ वाजतां स्पेशल मोटार आली त्यांत ५ वाजतां बसलों. जातांना कोणाच्या तोंडून कांहींहि शब्द निघत नव्हता; निघाला असता तरी मोटारीच्या आवाजामुळें तो स्पष्टपणें ऐकूं आला नसता. पेट्रोलची का कसलीशी घाण येतच होती आणि प्रत्येकाचीं मनें तर दुःखमग्न. शिवाय प्रत्येकाला कांहीं तरी बोलावें अशी इच्छा जरी होती तरी अशावेळीं भलताच शब्द तोंडून जाऊं नये म्हणून प्रत्येक जण ओंठावर आलेले शब्द गिळीत होता. "आज फार थंडी नाहीं" "मोटार फार जोरांत चालली आहे" या पलीकडे कोणी कांहीं बोललेंच नाहीं. सृष्टीला आमच्या दुःखाची किंवा संकोचाची जाणीव होती असें दिसलें नाहीं; कारण कोंबड्यांचें आरवणें, कावळ्यांची कावकाव, कुत्र्यांचें भुंकणें, पूर्वीसारखेंच चाललें होतें. आभाळांत आज ढग कांहीं अधिक आले नाहींत, सूर्य वेळच्यावेळीं उगवला, उजेड नेहमींसारखाच क्षणाक्षणाला अधिक अधिक स्पष्ट होऊं लागला, उष्णता रोजच्या प्रमाणेंच हळूहळू वाढूं लागली आणि विनायकराव भोळ्यांसारखा महात्मा मृत्युवश झाला याची जणूं कांहीं दखलगिरीच नाहीं अशा भावनेनें गाढवें, गुरेंढोरें,

बैलगाडीवाले, मोटारवाले, भाजीविक्ये, दूधविक्ये वगैरे लोकांचे व्यवहार चालू झाले. आठ वाजण्याच्या सुमारास आम्हीं पिंपळगांवाला आलों आणि मोटारवाल्यानें एका चहाकॉफीच्या ब्राह्मणी दुकानासमोर गाडी थांबवली आणि तो दुकानांत शिरला. चहा पिण्याची सगळ्यांना इच्छा उत्पन्न झाली, पण संकोचामुळें कोणी कांहीं बोलेना. मी धीर करून जणूं कांहीं हवेंतच म्हटलें "कोणाला चहा घ्यायचा आहे का?" पण कोणीच कांहीं बोलेना. अखेर मी निलाजऱ्या माणसाचें सोंग आणून म्हटलें कीं "मला थकल्यासारखं झालं आहे. मी चहा पितों बाबा." तरी देखील कोणी कांहीं मोटारींतून उठेना. तेव्हां सरलेनेंच चाणाक्षपणें सगळी परिस्थिति ओळखून निश्चयाच्या स्वरानें म्हटलें, "नारायणराव, मला पण पाहिजे चहा. तुम्ही आणि मी पिऊं या." असें म्हणून ती खरोखरीच उठली आणि मोटारींतून उतरून दुकानांत जाऊं लागली. तिच्या पाठोपाठ दुसरी मंडळीहि गेली. दुकानांत चहा घेणार इतक्यांत तिच्या मनांत कल्पना आली असावी कीं आपण या आसपासच्या खेड्यांत कांहीं जणांना तरी अस्पृश्यासारखे वाटतों, तेव्हां दुकानांत शिरलों असतां अपमान व्हायचा आणि इतरांना चहा मिळावयाचा नाहीं. हा विचार आल्याबरोबर ती लगेच मोटारींत चढली आणि तेथेंच तोंड धुण्याकरितां पाणी मागून घेतलें आणि चहाचा घोटच घेतला; कारण बशींतला चहा निवाला होता या निमित्तानें त्यांनीं बशींतला चहा फेंकून दिला आणि कपांतल्या चहाचा घोट घेतला असेल नसेल तोंच हुंदका येऊन सगळा चहा मोटारींत सांडला! हें मीच तेवढें पाहिलें, इतरांना दुकानांत गेल्यामुळें हा प्रकार दिसला नाहीं. हा प्रकार पाहिल्यावर माझ्या डोळ्यांतहि अश्रू आले, पण दुकानांत गेलेली मंडळी बोलावूं लागली तेव्हां मन घट्ट करून मीहि दुकानांत गेलों आणि आधींच बेचव आणि कडवट असलेला चहा कडू तोंड करून घेतला.

मोटारींत येऊन बसल्यावर त्या गांवीं एका देशभक्तानें चालविलेल्या एका राष्ट्रीय शाळेंतल्या प्राथमिक वर्गांतलीं गांधीटोपी घातलेलीं लहान मुलें

दिसलीं. तीं शाळेंतून परत येत असावींत; कारण "ए गोप्या, शाळेकडे कशाला चाललास ? आज शाळेला सुट्टी आहे" असें त्यांपैकीं एकजण म्हणाला. "कसली रे सुट्टी ?" असें गोप्यानें विचारल्यावर "कोणी काळे का भोळे देशभक्त मेला अशी बातमी आली आहे. अरे आज सुट्टी आहे, चल विटी-दांडू खेळूं या" असें तो म्हणाला आणि गोप्याला घराकडे ओढूं लागला.

मोटारींत बसलेले जे आम्हीं त्यांना हा संवाद ऐकून काय वाटलें असेल ? आणि सरलेला काय वाटलें असेल ? कोण कसें सांगणार ? तिनें पदरानें तोंड झांकून घेतलें आणि आंतल्या आंत ती हुंदके देऊं लागली एवढें मात्र मला ठाऊक आहे.

पुढील प्रवासांत विशेष कांहीं घडलें नाहीं.

आम्हीं पुण्यास घरीं वेळेवर पोंचलों. तेथें अप्पांची गांठ पडल्यावर त्यांना आणि सरलेला, इंदूताईंना, मला आणि इतरांना काय झालें असेल हें विस्तारानें मी सांगत नाहीं. पहिल्यानें जो आकान्त झाला तो ओसरल्यावर शोक गिळून टाकण्याचा सगळ्यांचा धीराचा प्रयत्न चालला असतां देखील जे दुःखावेग, जें मुळूं मुळूं रडणें, जें डोळें पुसणें, जो दुसऱ्यांच्या समाधानाचा अश्रुयुक्त प्रयत्न, जो ओढून ताणून केलेला वेदांतोपदेश झाला, त्याचें वर्णन करणें माझ्या शक्तीच्या पलीकडचें आहे आणि स्वभावाच्या विरुद्धहि आहे.

अप्पांची कंबरच खचलेली आहे. म्हातारपणीं हा फारच मोठा आघात झाला. त्यांतून निभावून जाणें कठीण दिसतें.

सरलेनें बाह्यतः तरी शोक गिळलेला दिसतो. ती घरांतलें काम करूं लागली आहे आणि लोकांनाच उपदेशाच्या गोष्टी सांगूं पहाते पण आंतलें दुःख कसें लपणार ? आणि हे प्रयत्न कितीसे सफळ होणार ?

"माझ्याबद्दल शोक करूं नका, मी शिक्षकीण होऊन जनसेवेचें त्यांचें व्रत पुढें चालवीन" असें मधून मधून सरला डोळे पुशीत आणि

हुंदके देत म्हणत होती. पण या बोलण्याला आज विशेष महत्त्व देण्याचें कारण नाहीं. त्यांच्या मनाची ठेवण मात्र यावरून चांगली दिसून येते. कळावें.

आपला,

**नारायण पाठक**

---

[ ६१ ] पुणें,

३१–१–३४.

मित्रवर्य नारायणराव पाठक यांस भाऊ काळे याचा साष्टांग नमस्कार वि. वि.

पहिल्या प्रथम मला आज अशी एक गोष्ट लिहावयाची आहे कीं एकंदर परिस्थितीचा आमच्या सौभाग्यवतींवर असा कांहीं परिणाम झाला आहे, कीं ती माझ्याशीं फारच नम्रतेनें वागते, आणि माझें मन लहानशा बाबतींतहि दुखवूं इच्छीत नाहीं. अप्पांची सेवा करण्यांत आणि त्यांच्या हरतऱ्हेच्या खस्ता खाण्यांत तिला आनंदच वाटतो! सरलेबद्दल तर तिला बहिणीप्रमाणेंच प्रेम वाटूं लागलें आहे. आपल्या कलानैपुण्याचा उपयोग इतरांना व्हावा म्हणून ती येथील एका शिक्षणसंस्थेंत गायन-शिक्षिकेचें काम स्वयंसेविका म्हणून करूं लागली आहे. सौ. बद्दलची माझी वृत्ति निवळली होतीच, पण मनांत थोडेंसें जें शल्य होतें तें बिन्दु-माधव म्हस्करांच्या आत्मकथनपर पत्रानें पार निघून गेलें. आतां आमचीं मनें अत्यंत शुद्ध झालीं आहेत. दुःखांत सुख एवढेंच.

सरलेला तूं इथेंच राहून जनसेवा कर असें मीं आणि सौभाग्यवतीनें परोपरीनें आग्रहपूर्वक सांगितलें, पण ती पांचबावडीसच पुनः जाऊन पतीचें शैक्षणिक व सामाजिक कार्य चालू ठेवणार आहे. विनायकरा-वांच्या पुण्यस्मरणार्थ मी व सौभाग्यवती यांनीं तिच्या स्वाधीन २५००० रुपये केले आहेत व पांचबावडीस " विनायक समाज–सेवा संस्था "

काढण्यास तिला सांगितलें आहे. तेथें गुंडांपासून उपद्रव होऊं नये म्हणून संस्थेच्या मालकीची एक शाळेकरितां इमारत व एक राहाण्याकरितां घर मी बांधून देणार आहें. तिच्याबरोबर दोन पोक्त अशा ट्रेन्ड बाया, एक गोपाळराव देवधर यांनीं शिफारस केलेली आणि एक प्रो. अण्णासाहेब कर्वे यांनीं शिफारस केलेली, अशा जाणार आहेत. शिवाय एक ट्रेन्ड मिडवाइफ देवधरांच्या संस्थेकडून मिळेल असें वाटतें. त्यांची सोबत आणि संगति सरलेला फायदेशीर होईल. तिच्या बरोबर एक १० वर्षांची मुलगी अगदीं अनाथ असलेली जाणार आहे. चिंगीहि कांहीं दिवस जाऊन राहाणार आहे.

सरलेची एकंदर वृत्ति आणि तिची कर्तृत्वशक्ति पाहून आनंद होतो. लौकिक दृष्ट्या पाहिलें तर तिचें जीवित दुःखमयच गेलें व पुढेंहि तें तसेंच राहणार आहे. पण लौकिक दृष्टीहून उच्चतर अशी एक दृष्टि आहे. लौकिक-दृष्ट्या ध्येयें म्हणजें दुःखें; पण या दुःखांतच उच्च व सात्विक आनंद भरलेला आहे, हें मार्मिकांना समजतें. ( म्हणजे तुम्ही आणि मी मार्मिक ठरलोंच ! )

भाऊ काळे

समाप्त